# तिच्याकरितां

लेखक

कॅप्टन गो. गं. लिमये



प्रकाशक

केमकर आणि मंडळी, बुकसेलर्स,

गिरगांव बॅकरोड, मुंबई नं. ४



२४-८-१९३३, गणेशचतुर्थी, १८५५

किंमत १२ आणे

# अनुक्रमणिका

# तिच्याकरितां



## पाकी हिरा



"हिला देवी काढल्या नव्हत्या वाटतं?" तिचा तो चिमुकला कोवळा बाहु इकडे तिकडे वळवून पहात डाक्टरांनीं विचारलें व त्यांची चर्या गंभीर झाली.

त्याबरोबर हिराबाईच्या मनाला जबरदस्त धक्का बसला. किंचित् अडखळत कांपऱ्या आवाजांत ती म्हणाली, "काढायच्या होत्या, पण—"

मध्येंच गणपतराव म्हणजे हिराबाईचे यजमान म्हणाले, "चार महिन्यांपूर्वीच बेत होता; पण कांहींना कांहीं अडचण येऊन तें थोडें लांबणीवर पडलें." त्यांची चर्या देखील भयभीत व गंभीर झाली.

तेथें समाचाराला बसलेल्या बायाबापड्यांच्या, दाराआडून लपून डोकावून पहाणाऱ्या आत्याबाईची व स्वयंपाकीणकाकूंची, अर्ध्या जिन्यावरच थबकून पायऱ्या सारवणाऱ्या मोलकरणीची-सर्वांच्या मुद्रा तशाच गंभीर झाल्या. ओटीवर पत्र फेंकून परत फिरणारा पोस्टमनहि पळभर तिकडे मान वळवून 'अरे बापरे! देवी!' अशा अर्थानें डोळे घाबरे करून आपल्या वाटेनें अंमळ त्वरेनेंच पाऊल उचलून चालता झाला. ओटीवरच दाराच्या चौकटीवर हात देऊन उभे असलेले शेजारचे केसुकाकाहि चांगलेच हवालदील झाले. कारण त्यांना पाठोपाठचीं सहा मुलें होतीं.

देवी काढल्याच्या खुणा नसलेले ते दोन 'इवलाले' नाजुक बाहु असलेला रोगी म्हणजे गणपतराव व हिराबाई यांचें पहिलेंच कन्यारत्न होतें. त्या कन्यारत्नाच्या दंडाला बाहु हा संस्कृत मृदु शब्द वापरण्याचें कारण इतकेंच कीं, तशा अत्यंत कोमल व मृदु अवयवाला 'दंड' हा मर्दानी व कणखर शब्द अंमळ

कसासाच विसंगत वाटतो. दंड हा शब्द पिळदार अवयवाला लागू केला तरच यथार्थ व बरा लागतो. पण उलट तिचे ते बाहू देवीवणरहित असल्याकारणानें उलट पाहणाऱ्याच्याच मनाला पीळ पाडीत होते. तिच्या त्या लुसलुशीत बाहूंना व्यायाम नव्हता असें नाहीं. तिचा जागेपणींचा सर्व वेळ ते हात नाचविण्यांतच जात होता. पण त्या व्यायामामुळें उलट बाळसेंच जास्त चांगलें येऊन ते हात पहिल्यापेक्षांहि आतां पुष्ट व कोमल भासूं लागले होते. नेहमीं मऊ अंगड्यांत किंवा ऊबदार दुपट्यांत असल्यामुळें व रोज स्निग्ध केले गेल्यानें त्या बाहूंना अद्याप कसलाच कठीण किंवा तीव्र संसर्ग झाला नव्हता. त्या बाहूंना स्पर्श व्हावयाचा म्हणजे अंगाला लावणाऱ्या वाईच्या तैलयुक्त किंवा हिराबाईच्या स्वभावतःच गोंडस हातांचा. हिराबाई गणपतरावांना देखील तिला वेडीवांकडी घेऊं देत नसे, इतकी ती तिला जपे. तें अपत्य तिला अर्थात् जीव कीं प्राण असे. तिच्या नादांत ती बाहेरचें सर्व जग विसरली होती. तिला आतां बाहेरच्या जगाचें, किंवा तिच्या लेंकराला उपजल्यापासून फुंकराचें देखील वारें खपत नव्हतें. मग तिला देवी टोंचण्यास तिचें मन कसें घेणार? ती कल्पनाच तिच्या अंगावर शहारे आणी. दोन चार बळकट जवानानीं तो लहानसा हात गच्च पकडावयाचा, एका मर्दानें तिचें डोकें बळकट आवळून धरावयाचें, आणखी एका पहिलवानानें तिचे झाडणारे पाय करकचून दाबावयाचे व मग त्या निष्ठुर देवीडॉक्टरानें एक बारीक सुईसारखी टोंकाटोंकांची टोंचणी त्या किंकाळ्या फोडणाऱ्या अज्ञान व कोमल अर्भकाच्या कोमलतर दंडांत गिरमिटासारखी खुपसून निर्दयपणें फिरवावयाची—अशी हिराबाईची देवी काढण्यासंबंधींची पुसट आठवण होती. पूर्वी कान टोंचतांना देखील त्यांना अंधेरी आली होती म्हणतात. पण पुढें त्याच कानांत सुंदर डूल घातलेले पाहण्याची अनिवार इच्छा असल्यामुळें त्या दर्शनानंदाकरितां त्यांनीं प्रथम ती अंधेरी पत्करली होती. हिऱ्याची पारख अधिक चांगल्या रीतीनें करतां यावी म्हणून रत्नपारखी प्रथम अशीच अंधारकोठडीची शिक्षा करून घेत असतात. पण देवी टोंचून त्या ठिकाणीं कांहीं अलंकार घालावयाचा नव्हता! उलट दंडावर तो एक कलंक मात्र लागावयाचा! याऐवजीं ‘अष्टभुजा’ या नांवाचा एखादा रत्नखचित सोन्याचा अलंकार अडकविण्याकरतां दंडांत आरपार भोंक पाडावयाचें असतें तर कदाचित् हिराबाई त्या गोष्टीला कबूल झाल्या असत्या! पण देवी टोंचल्या तर लेंकराला दुखेल, मग फोड येतील, पाडसाला ताप येईल, आणि महिनाभर

हें सारें भोंवेल, आणि पुढें काय ? तर पांच डाग रहाण्याचे ! कशाकरितां, तर देवी येऊं नयेत म्हणून. या दिव्यांतून जिवंत सुटली तर पुढें देवीची भीति ! कोणीं पाहिलें आहे पुढचें ! साखळ्या घालून पाय काळे झाले, त्यावर जखम झाली, फेंगडें चालावें लागलें तरी पण तो अलंकार आहे. पण देवी अलंकार नसून तिलाच अलंकार घालण्यास योग्य अशी मात्र आहे.

रोज न्हाऊ माखूं घालतांना लेंकरूं रडतें व अकांडतांडव करतें त्या मानानें देवी टोंचतांना निम्यानें देखील रडत नाहीं किंवा थयथयाट करीत नाहीं. खाऊ दिला नाहीं म्हणून मूल त्रागा करतें, पण त्याच्या शतांश देखील देवी काढतांना तें त्रागा करीत नाहीं. आपल्याला जितक्या वेदना होतात तितकें लहान मुलाला संवेदनाज्ञानच परिपक्क झालेलें नसल्यामुळें दुःख होत नाहीं. पण मातेच्या मायेपुढें कसली मात्रा चालणार !

हिराबाई म्हणजे मुलाला देवी काढण्याच्या विरुद्ध होती असें मात्र नव्हे. इतर सर्वच तान्ह्या मुलांना देवी काढतात तशाच आपल्या लानीलाहि काढा-वयाच्या इतकेंच; पण लहानगी लानी तिची लाडकी होती. ती जन्मापासूनच अशक्तप्रकृति व वयाच्या मानानें लहानगट होती. म्हणूनच तिचें लहानी-लानी असें टोपण नांव पडलें होतें. चार महिन्यापूर्वीं, म्हणजे लानी सहा महिन्यांची असतांच तिला देवी काढण्याची गोष्ट निघाली होती. पण अद्याप ती अति-शयच लहान या सबबीवर तें लांबणीवर मुद्दामच टाकलें गेलें. पुनः केव्हांतरी ती गोष्ट निघे; पण कांहीं ना कांहींतरी अडचण येई. आज काय गणपत-रावांकडे कोणी जेवायला येणार, उद्यां काय तर हिराबाईच्या वन्संना शिवायचें नसल्यामुळें ती त्यांच्या इथें करून घालावयाला जाणार. केव्हां घरीं कोणी आजारी; व घरीं कोणी आजारी नसे तेव्हां एखाद्या पाहुण्याचा रोग घरांत असावयाचाच. पुढें उन्हाळा म्हणून गणपतरावहि आठ दिवस उन्हाळ्याच्या दिवसांत महाबळेश्वराला गेले; त्यानंतर चातुर्मास्यांत नेमधर्म, व्रतें-उद्यापनें यांत दिवस गेले. याप्रमाणें कधीं मुलगी लहान तर कधीं घरांत करावयाला मोठें मनुष्य कोणी नाहीं, कधीं घरचा आजार तर कधीं दारचा आजार मिळून देवी काढण्याला कांहीं मुहूर्त सांपडला नव्हता. लानी आतां पुरी अकरा महिन्यांची झाली होती.

“राहूं दे सध्यां,” माणकबाई म्हणाल्या होत्या. “अजून लहान आहे— आमच्याकडे तर बाई वर्ष झाल्याखेरीज बोलतच नाहींत.”

"तेंच म्हटलं," सोकरबाईनीं री ओढली. "काढतां येतील पण ऐन उन्हाळ्यांत कशा काढायच्या ?"

पण देवी काढवल्या नाहींत तर संधि साधून त्याच येतात. देवी काढवणें बंद केलें तर पूर्वीप्रमाणेंच तिच्या तडाक्यांतून क्वचितच मुलें वांचतील.

लहानग्या लानीचा तो चिन्हरहित हात म्हणजे देवीला बोलावणेंच होतें. तो चिन्हरहित हात एखाद्या डांबर न लावलेल्या खांबाच्या बुंध्याप्रमाणें होता. त्याला कीड लागली तर तो पोखरला जाऊन वरची इमारत केव्हां खालीं येईल याचा नेम नाहीं. तो चिमुकला बिगरवणांचा हात म्हणजे गॅरंटीचा छाप नसलेल्या चिमुकल्या घड्याळाप्रमाणें साशंक करणारा होता. तो वणरहित हात एखाद्या तोंड उघडेंच टाकलेल्या बरणींतील मुरंब्याप्रमाणें होता. त्याला मुंग्या लागूनच त्याचा केव्हां सत्यानाश करतील कोण जाणे!

साधारण शुक्रवारीं देवीला जाऊन येण्याचा हिराबाईचा नेम असे; पण गेल्या शुक्रवारीं कांहीं कारणानें त्यांना घराच्या बाहेरच पडतां आलें नव्हतें. त्याच दिवशीं तिन्हीसांजांपासून लानी दूध पिईनाशी झाली व हळूहळू तिला ताप भरत चालला तो १०४ च्या वर गेला. शनिवार—रविवार दोन्ही दिवस असाच ताप होता. सकाळीं १०१ पर्यंत उतरे. आंचके येऊन तो हाता-पायांना झटके देऊं लागली. घरगुती औषध केलीं. 'थंडी झाली तिला,' माणकबाई म्हणाल्या, 'तुम्ही मुली पाण्यांत ओलेत्यानें रहातां—बाधतं मग लेंकराला.' सोकरबाईच्या मतें हा उष्णाचा ताप होता. "कारण" त्या म्हणाल्या, "तुम्ही मुली वेडंवांकडं खातां, चहा ढोसतां—पण मुलाला उष्ण होतं मग अशानं." गणपतरावांच्या धाकट्या भावाच्या मतें याचें मूळ 'रडायला लागलें कीं मुलाला घेण्या'मध्यें होतें. त्यामुळेंच त्यांना अपचन होतें. त्याचप्रमाणें आणखीहि पुष्कळ कारणपरंपरा अनेकांनीं दिली व उपायहि सुचविले.

कोणीं डोक्यावर बर्फ ठेवा म्हणाले, तर कोणीं तिला गरम पाण्यांत बुचकळून काढा म्हणून सांगितलें. कारण तिला आचके येत होते. कोणी वैद्याची सल्ला घेण्यास सांगितली तर कोणीं डॉक्टर सुचविला. कोणीं मागल्य आळींतील आजीबाईंना दाखवा म्हणून आग्रह धरला. पण कांहीं गुण येईना ताप उतरेना. मुलगी तळमळ करी व दमली म्हणजे आपोआप गप्प पडे

गणपतरावहि घाबरले. हिराबाईच्या हृदयाचें पाणी पाणी झालें. आतां काय होतें आणि काय नाहीं कोण जाणे.

चार दिवसांपूर्वींच्या ज्या बाळानें आपल्या बालिश लीलांनीं मातापितरांना व इतर जनांना गुदगुल्या कराव्या त्याच बाळानें आज स्वतःबरोबरच सर्वांचे चेहरे गंभीर केले. तिच्या त्या बाळसेदार प्रफुल्लित चेहऱ्याकडे किती वेळ पहात राहिलें तरी हिराबाईला पुरेसें वाटूं नये. पण आज त्या बाळाच्या निर्विकार व आरक्त झालेल्या चेहेऱ्याकडे पाहिलें कीं, तिला अधिकच भीति वाटे. त्याचा चेहरा निर्विकार होता तरी, थोडी त्रासल्याची, थोडी चिंतेची व थोडी दुःखाची अशा छाया मधूनमधून त्यावर पडत. मध्येंच एकदम तें आचके देई, तेव्हां तर आईचा जीव बाळाच्या हातापायांबरोबर वरखालीं होत असे. मुलीला ज्या कुशीवर निजवावें त्याच कुशीवर ती पडून राही. मग मुद्दामच आईनें तिला दुसऱ्या कुशीवर निजवावें. पण ती पिईना व वरचें दूधहि गिळीना. डोळे लाल झाले होते व सर्वांगहि लालसर दिसत होतें. 'लानी बाळ, आतां कसं वाटतं?' असें मधून मधून हिराबाई विचारी तेव्हां लानी डोळे किंचित् किलकिले करी, त्याच निर्विकार मुद्रेनें आईकडे पाही, व पुनः तिचे डोळे मिटत.

*     *     *     *

याच वेळीं चेलाबाई व त्यांचे यजमान मुकुंदराव आपल्या नूतन पांच महिन्यांच्या अर्भकासह आपल्या कुलदेवतेस केलेला नवस फेडण्याकरतां म्हणून निघाले होते, त्यांनीं वाटेंत हिराबाईकडे मुक्काम केला. त्यांचा मूळ उद्देश जरी येथेंच चार दिवस राहून गांवांतील प्रेक्षणीय स्थळें पाहून पुढें जाण्याचा होता, तरी लानी आजारी असल्यामुळें त्या दोघांहि नवराबायकोनीं आपापल्या मनांत त्याच संध्याकाळीं तें घर सोडण्याचा निश्चय केला. कित्येक वर्षांनंतर नवसा–सायासानें त्यांना पुत्ररत्न लाभ झाला होता. तेव्हां नवस शक्य तितका लवकर फेडणें प्राप्त होतें; म्हणून शेवटीं परत जातांना 'पुनः येतोंच' असें सांगून या दांपत्यानें आपल्या लेंकरासह तेथून पाय काढला.

चिन्ह कांहीं चांगलें नाहीं असें पाहून गणपतरावांनीं आज डॉक्टर काश्यपांना आणलें होतें. डॉक्टर काश्यप साधारण उंचीचे, बेफाम रुंदीचे गोरटेले व पुष्कळ मिशांचे असे छाप टाकणारे गृहस्थ होते. अलीकडे गांवांत व

गांवाबाहेरहि त्यांची बरीच प्रसिद्धी झाली होती. कारण त्यांनीं कांहीं पेटंट औषधें काढलीं होतीं, ( तीं एका नामांकित डॉक्टरानें लिहून दिलेलीं होतीं. ) डॉक्टर काश्यप गांवांतील सार्वजनिक बाबींत लक्ष घालीत असत. मेळे, गणपति-उत्सव, सभा, संमेलन, खादी, चरखा इत्यादि विषयांत ते मन घालीत. बोलण्यांत गोड, पाल्हाळिक व कोणाचेंहि मन आकर्षून घेणारे असे ते होते. डोक्याला गांधी टोपी, अंगांत लांब खादीचा अंगरखा व एक बडगा असा त्यांचा पोषाख असे. त्यांची घरची वागणूकहि धार्मिक व जुन्या पद्धतीची असे. त्यामुळें बहुतेक लोकांना डॉ. काश्यपच हल्लीं हवेसे वाटूं लागले होते. एक सांगावयाचें राहिलें—डॉक्टर काश्यप तसें म्हटलें तर कांहीं डॉक्टरीची किंवा वैद्यकीची परीक्षाच पास झाले नव्हते; पण एका नामांकित डॉक्टरांच्या हाताखालीं ते पढलेले—त्यांचेच कंपौंडर होते.

त्यांनीं अलीकडे एक नवीन तत्त्व बसविलें होतें, व त्याला अनुसरून त्यावर एक अत्यंत साधा पण रामबाण उपायहि त्यांनीं शोधून काढला होता. ९८ टक्के आजाराच्या मुळाशीं खाण्यापिण्यांतील गैरशिस्तपणाच असतो व हें अपचन दूर करण्याकरितां एरंडेल तेलासारखें दुसरें औषध नाहीं. लहान मुलांना तर तें पृथ्वीवरील अमृतच होय. कफ, पित्त, वात अगर श्वसनक्रिया, रुधिराभिसरण, आंतडीं, मज्जातंतू वगैरेंच्या सर्व रोगांवर एरंडेलच देण्याचा त्यांनीं सपाटा चालविला होता. अर्थात् ते एरंडेलच आहे असें मात्र ते रोग्याला सांगत नसत. पण सार्वजनिक व्याख्यानांत वगैरे ते आपला सोपा शोध जोर—जोरानें प्रतिपादित असत. ते जरी रोग्याला सांगत नसत, तरी रोग्याला मात्र एरंडेलाचा संशय आल्याखेरीज राहात नसे. बरेचसे साधे रोग या तेलाच्या सेवनानें बरे होत व त्यामुळें डॉक्टरांचा देखील आपल्या तेलावर हळूहळू नकळत इतका विश्वास बसत चालला कीं कोणत्याहि तऱ्हेच्या रोगावर ते आतां या तैलास्त्राचा मारा करूं लागले. जखमेवर हेंच तेल लावल्यानें कातडी नरम पडते, डोळ्यांची आग कमी करतें, अपचन, वांति, दमा, क्षय, संधिवात, महामारी इत्यादि सर्व रोगांवर हें एकच साधें पण अचुक गुणकारी औषध आहे अशी त्यांची ठाम समजूत आहे. तेल, मिक्श्चर, गोळ्या, पुड्या, पिचकारी अंगाला चोळणें इत्यादि तऱ्हेनें तेलाचा ते उपयोग करीत. आपल्या शोधाचें त्यांनी एक लहानसें पत्रक काढून तें फुकट वाटलें होतें. वर्तमानपत्रांत व मासिकांत त्यांनीं लेख

लिहिले असून लवकरच आत्ममतप्रसारार्थ सर्व हिंदुस्थानभर व जमल्यास पश्चिमगोलार्धांतहि सफर करण्याचा त्यांचा विचार आहे. " एरंडगुणधर्म संशोधन " नांवाचें एक मासिक काढण्याचें सध्यां घाटत असून, ' एरंड संशोधक मंडळ ' स्थापण्याचा त्यांचा विचार असल्याचें कळतें. असो.

डॉक्टर काश्यपांनीं नंतर एक औषध लिहून दिलें व तो कागद गणपतरावांच्या हातांत देत ते म्हणाले, " आधीं हिला एक चमचा एरंडेल पाजा, आणि तुम्हीं पण सर्वजण इतकं इतकं तेल घ्या. आणि हें औषध द्या... नीट जपलं पाहिजे बरं का... आणि हें पाहा, तुम्हीं सर्वजण देवी काढवून घ्याल तर बरें. अन् या खोलींत दुसऱ्या कोणाला येऊं देऊं नका... उद्यां कळवा मला. " असें म्हणून ते जाऊं लागले; पण पुनः थांबून म्हणाले. " अन् हें पाहा, त्याला एरंडेल द्यायला मात्र विसरूं नका हो ? नाहीं तर तें मिक्श्चर पचायचं नाहीं. अन् तुम्हीं पण रोज थोडं थोडं घेत जा—निदान आठवड्याला तरी. " पुनः ते जाऊं लागले. पण फिरून थांबून त्यांनीं एरंडेलमहात्म्यावर एक छोटेसें प्रवचन दिलें, व गणपतरावांच्या कित्येक प्रश्नांना उत्तरें देऊन पुनः तेलासंबंधीं बजावून ते निघून गेले.

* * * *

डॉक्टर काश्यपांच्या एरंडेलानें अखेर गुण तर आला, व लानी देवीसारख्या भयंकर रोगांतून उठली. रोगरूपी शत्रूशीं लढण्यांत लानीबाईच्या तोंडावर व अंगावर कांहीं वण मात्र राहिले; पण ते विशेष वाईट दिसण्याइतके नव्हते व पुढें फिके पडण्याचा संभव होता.

* * * *

आज लानीचा वाढदिवस साजरा करण्याचें ठरलें होतें. अर्थात् आज हिराबाईचा आनंद गगनांत मावेना. कारण हा वाढदिवस उगवतो कीं नाहीं याची शाश्वति नव्हती. लानी तिची पहिलीच लाडकी मुलगी तिचे पंचप्राणच. तेव्हां आज त्या स्वतःच मासळी चिरायला बसल्या होत्या. सकाळींच गणपतरावांनीं दोन धष्टपुष्ट असे मोठाले ताजे मासे बाजारांतून आणून, त्यांच्याकडे दिले होते.

ते गुटगुटीत ताजे ताजे मासे पाहून घरांतील मंडळीच्या तोंडाला पाणी सुटलें होतें. त्यांची ती तुळतुळीत, लवचीक व ओलकट दिसणारी पण कोरडी पांढरी सफेत कातडी, कलिंगडाप्रमाणें दिसणारीं त्यांचीं लाल फुफ्फुसें, ते

पाणीदार वाटोळे करकरीत फुगीर डोळे-मासे पण मासे होते. त्या माशांच्या जोडीला उगीच नाहीं दीड रुपया वेंचला !

मासे बांधून आणलेल्या कागदाच्या पुडीचा कागद विळीजवळच पसरला होता व त्यावर माशांचीं आंतडी, कांटे वगैरे निरुपयोगी भाग टाकले होते. या वेळीं बारीक काप काढण्यांत हिराबाईचे गोंडस हात गुंतले होते. हिराबाई-मध्यें आणि त्या माशांत पुष्कळच साम्य होतें. हिराबाई जात्याच गोरीपान असून तिच्या गालावर रक्तिमा होता. तिचे डोळेहि पाणीदार होते व अंगकांति त्या ताज्या माशांच्या त्वचेला खालीं पहावयास लावणारी होती. तिचे ओंठ लालीमध्यें त्या माशांच्या फुफ्फुसाची स्पर्धा करीत होते.

इतक्यांत गणपतराव दारांत येऊन ह्मणाले, "ऐकलेंस का ? नवलच ! आपल्या चेलाबाईचा मुलगा गेला म्हणे ! आतांच मुकुंदरावांच्या भावाचे पत्र आलें."

डाव्या हातांत अर्धा मासा व उजव्या हातांत चिरलेला एक काप तसाच धरून व वर मान करून हिराबाई उद्गारली, "अग बाई ! म्हंजे ? केव्हां अन् कशानं ?"

"गेल्या गुरुवारीं. झाले आठ दिवस-अन्-अन् मुकुंदरावहि-देवाच्या घरीं गेले !"

"म्हणजे ? काय ऐकतें मी हें !" अत्यंत सखेदाश्चर्यानें हिराबाई ओरडली, व हातांतील माशाचें अर्धुकलें व काप खालीं पडतील म्हणून तिनें ते ज्यास्तच बळकट पकडले. "अरे राम ! काय करावं तिनं आतां ! पण असे एकाएकीं कशानं वारले ?"

"देवी !"

"देवी ?...काय देवी ?" माशाचें अर्धुकलें आणि काप आतां हिरा-बाईच्या हातून गळून पडले. त्यांच्या मनांत कांहींतरी प्रकाश चमकला.

त्यांना अत्यंत वाईट वाटलें, त्यांच्या हृदयाला धक्काच बसला. ज्या देवीनें चेलाबाईचें सौभाग्य आणि पुत्रसुख नष्ट केलें त्याच देवींतून आपली लानी वाचली याबद्दल त्यांनीं एकीकडून देवीचे शतशः आभार मानलें.

त्या माशाप्रमाणें त्या बातमीनें त्यांचें अंतःकरण दुभंगलें. आपल्या शरीराचे कोणीं शतशः तुकडे करीत आहे असें त्यांना वाटलें. त्या माशाप्रमाणेंच त्यांची आंतडीं पिळून निघालीं. आपलें काळीज तळल्यासारखें त्यांना झालें.

" लानीला ताप आला त्या दिवशीं ते येथें उतरले होते व तेव्हांच त्यांच्या मुलाला तेंच विष बाधलें असलें पाहिजे असें तेथील डॉक्टरानें म्हटलें व मुलाचा दोष बापालाहि बाधला." गणपतरावांनीं म्हटलें.

पण ही कार्यकारणपरंपरा हिराबाईच्या मघांच लक्षांत आली होती. व म्हणूनच त्यांना मेल्याहून मेलें झालें होतें.

हिराबाईला कांहीं सुचेनासें झालें. आतां कसला लानीचा वाढदिवस ! कारण, चेलाबाई आणि हिराबाई या एकाच वर्गांत होत्या. चेलाबाईचें लग्न झाल्यामुळें तिनें लवकरच शाळा सोडली होती व हिराबाई मराठी चवथीपर्यंत शिकली. पण त्या शेजारीं शेजारींच रहात असल्यामुळें त्यांचें विशेष जाणेंयेणें चालू असे. पुढें चेलाबाईच्या नवऱ्याचें शिक्षण संपून त्याला दुसऱ्या गांवीं नोकरी लागली. पण निमित्तमात्रें हिराबाईकडे चेलाबाई कधीं कधीं येत असे.

आपण जर फाजील हट्ट न धरतां आणि क्षुल्लक अडचणींना फाजील महत्त्व न देतां वेळींच लानीला देवी काढवल्या असत्या तर तिला तर आल्या नसत्याच; पण चेलाबाईच्या संसाराचेंहि असें मातेरें होतें ना ! चेलाबाईच्या दुःखाला, आपत्तीला कारण आपणच, असें त्यांचें मन त्यांना स्पष्ट सांगूं लागलें. चेलाबाई तिच्याच वयाची. तिच्या खऱ्या संसाराला आपल्याप्रमाणें नुकताच आरंभ झालेला. सुदैवानें तिला पतिहि अनुरूप असाच मिळालेला. तें सोन्यासारखें मूल प्रथमचें नवासा-सायासाचें. तोहि मुलगा. अशा त्या संसाराचा खेळखंडोबा करण्यास कारण आपणच ! लानी वाचली खरी—परमेश्वराची कृपा ! पण त्या तान्ह्या बाळाचा—मुकुंदरावांचा मी खूनच केला असं मला वाटतं, देवा, याचा जाब मीं कसा देऊं ! ! मी पापी, पण त्या पापाचं प्रायश्चित्त मात्र माझ्या मैत्रिणीला ! आणखी किती मुलांच्या नाशाला मी न जाणतां कारण झालें असेन ! आणि माझ्यासारख्याच आणखीहि किती तरी आया न जाणतां पापाचे घडे भरीत असतील ! माते जगदंबे, याचा जाब मी कसा देऊं !"

ते मासे व काप तसेच राहिले. त्यांच्या अंगावरील खवले पाहून त्यांनाहि देवी येऊन गेल्या होत्या कीं काय अशी शंका येऊन, त्याच कागदांत ते गुंडाळी करून भर रस्त्यावर फेंकून देण्यांत आले.

---

# तिऱ्यासाठीं



"कुर्ररर—टण-ण-ण-ण..."

गजरानें जयकर खाड्दिशीं जागा झाला व कुशीवर वळून, डोळे मिटल्या मिटल्याच हात लांब करून उशाकडील खिडकींत ठेवलेल्या घड्याळाचा खटका सारून त्यानें गजर बंद केला. नंतर डोळे चोळीत तो उठला. पण त्याच्या डोळयांवरची झांपड जाईना. त्यानें आणखी डोळे चोळले, तर्जनीनें चोळले, तळहातानें चोळले, मनगटानें चोळले, डोळयांच्या कोंपऱ्यांतून चिपडें काढल्यासारखें केलें, पण डोळयांवरील अभ्र जाईना. अर्धवट आंधळेपणानेंच त्यानें खुजांतील थंड पाणी डोळयांवर, डोक्यावर व कपाळावर हबकलें पण व्यर्थ. डोळे साफ होईनात. नीट दिसेना.

"म्हणजे ?" तो आपल्याशींच म्हणाला, "आहे तरी काय ? असं काय होतं आहे ? आणखीच बिघडले कीं काय डोळे एका रात्रींत ! म्हणजे छानच ! आज शेवटचा पेपर आणि हें काय विघ्न !"

आरसा पुढें धरून तो डोळे पाहूं लागला–पण स्पष्ट दिसेना. डोळे तारवटल्यासारखे वाटूं लागले. इतक्यांत त्याचा सोबती खोलींत आला. त्याला त्यानें आपले डोळे दाखवले. सोबती म्हणाला, "अरे ! बाहुल्या प्रसरण पावल्या आहेत. साध्या अंधेरानें नाहीं इतक्या मोठ्या व्हायच्या. पहा पाहूं इकडे उजेडाकडे."

त्याचा डावा डोळा एका तळहातानें बंद करून, दुसऱ्या डोळयावर सोबत्यानें दुसरा तळहात ठेवला. नंतर एकदम उजव्या डोळयावरील तळहात बाजूस करून पाहिलें–तो उजेडानें देखील बाहुली आकुंचन पावेना ! डाव्या डोळयाचेंहि तसेंच.

असें होण्याचें कारण काय !

जयकराच्या डोळयांना लहानपणापासूनच खुपऱ्या होत्या. त्या मधून बऱ्या झाल्यासारख्या वाटत, पुनः उद्भवत. अति वाचनानें त्यानें आपले डोळे

अधिकच बिघडवून घेतले होते. त्याला लोकांनीं—डॉक्टरांनीं पुष्कळ सांगितलें होतें पण जयकर मुळींच ऐकत नसे. वास्तविक तो जात्याच हुषार असल्यामुळें इतका अभ्यास करण्याची—पास होण्याच्या दृष्टीनें—त्याला मुळीं जरूर नव्हती. किंबहुना तो दोनचार वर्षें नापास झाला असता अगर परीक्षेला बसला नसता तरी कांहीं त्याला पोटाची काळजी नव्हती. पण ज्ञानाकरतां अभ्यास करणाऱ्यांपैकीं तो असल्यामुळें, रात्रीचे दिवस करून आपला सगळा वेळ घरीं अभ्यासांत व बाहेर वार्डांत तो घालवीत असे. त्याच्या आवडीचा विषय म्हणजे नेत्ररोगशास्त्र व त्या विषयांत पारंगतता मिळवून शोध लावण्याची त्याची जबर महत्त्वाकांक्षा होती. यालाहि एक कारण होतें. जयकराच्या घरांत खुपऱ्याचा रोग अनुवंशिकच होता. त्याच्या आईला, बहीणभावंडांना, आईच्या आईला—सगळ्यांना खुपऱ्या झाल्या होत्या, किंवा होऊन गेल्या होत्या. इतकेंच नव्हे तर, त्याच्या आजीचे डोळे तर म्हातारपणीं खुपऱ्यानें गेले होते व ती बिचारी दोन्हीं डोळ्यांनीं आंधळी झाली होती! खुपऱ्या अनुवंशिक आहेत काय, सांसर्गिक आहेत काय? इत्यादि विषयांची त्याला छाननी करावयाची होती, व खुपऱ्यावर कांहीं रामबाण औषध सांपडूं शकेल कीं काय, किंवा शस्त्रक्रियेनें त्यांचें मूळ कितपत उपटतां येईल त्याविषयीं प्रयोग करण्याची त्याची उत्कट इच्छा होती. आणि म्हणूनच स्वतःला खुपऱ्या झाल्या असतां व डोळ्यांचा फार उपयोग न करण्याची ताकीद त्याला मिळाली असतां, त्यानें त्या विषयाचा कसून अभ्यास चालविला होता.

परीक्षेंत नेत्ररोगचिकित्सेंत जो विद्यार्थी परीक्षकांच्या पूर्ण कसोटीस उतरेल, त्या विद्यार्थ्याला त्याच विषयाचा पुढें अभ्यास करण्याकरतां विलायतेस पाठविण्याकरतां प. वा. श्री. सौ. कांताबाई शिष्यवृत्ति नुकतीच ठेवण्यांत आली होती व ती मिळविण्याची अर्थात् त्याची जारीनें खटपट सुरू होती. असो.

रात्रीच्या जाग्रणामुळें असेल, असें त्याला पहिल्यानें वाटलें. त्याच्या खोलींत डोळ्यांचा एक दवाखानाच होता असें म्हटलें तरी चालेल. कारण रोज त्याच्या डोळ्यांना औषधपाणी चालूच होतें, 'बोरीक—पाण्यानें' त्यानें आपले डोळे धुतले, पुन्हां धुतले, सोबत्याकडून एक लेप पापण्या उलटवून लावला. पुन्हां डोळे धुतले. पण उत्तरोत्तर त्याची दृष्टि मंदावूच लागली. डोळ्यांपुढें अधिकच ढग जमूं लागले. सारा तर नाहीं वाढला? पण असा कोठें एका रात्रींत सारा वाढत असतो. सोबत्यानें पाहिलें पण बुबुळें साफ

होतीं. काय करावें समजेना. आज परीक्षेचा शेवटचा पेपर. नेत्ररोगाबद्दल पेपर. आतां आंधळ्यानें पेपर कसा लिहावयाचा? म्हणजे आटोपलेंच! मग कसली शिष्यवृत्ति आणि कुठली विलायत! मग कसचे शोध! धड नुसती संबंध परीक्षाहि नाहीं पसार होणार.

शेजारचे विद्यार्थी जमले, पण कोणालाच निदान होईना. शेवटीं इस्पितळां-तील डॉक्टरकडे ते गेले. पण डॉक्टरनांहि कांहीं उलगडा होईना. त्यांनीं खूप तपासलें. अंधाऱ्या खोलींत नेऊन डोळयांच्या आंतील भाग पाहिला, पण कांहींच दृश्यविकार दिसेना. 'पुन्हां संध्याकाळीं दाखव, नजरेखालीं डोळे ठेवले पाहिजेत,' असें म्हणून गरम बोरीक पाण्यानें डोळे धुणें चालू ठेवण्यास सांगितलें. 'लिहूं—वाचूं नको—स्वस्थ डोळयांवर अंधेर करून पड—भिण्याचें कारण नाहीं' असें ते म्हणाले. नंतर आपणच पुढें म्हणतात, "अरे हो पण आज तुला पेपर आहे ना? बैस, पेपराला बैस तशी कांहीं हरकत नाहीं."

पण त्याहा—वाचायला जयकरला स्पष्ट दिसतच नव्हतें तर तो पेपर काय लिहिणार? तितकें करूनहि त्याला कसबसा पेपर लिहितांहि आला असता—हत्ती—घोड्याएवढें एक एक अक्षर काढून व कुत्र्याचे पाय मांजरांत घालून. पण मग पहिल्या वर्गांत पहिला नंबर पटकावतां येईल कीं नाहीं? त्यापेक्षां न बसणेंच बरें!

एकाहि डोळयाला दिसेनासें झाल्यामुळें प्रत्यक्ष दृष्टिमांद्यापेक्षां त्याच्या अनपेक्षितपणाला तो अधिक भ्याला होता. सारा वाढतो कीं काय? बुबुळाला भोंक पडतें कीं काय? आजीसारखा मीहि आंधळा होणार काय? डोळे जाण्याच्या भीतिपेक्षां आपल्या महत्त्वाकांक्षेला खो बसतो कीं काय यानेंच तो अधिक घाबरला. आज नाहीं पुढल्या वर्षीं आपल्याला शिष्यवृत्ति मिळेल हें खरें असें त्याला वाटलें पण एक वर्ष फुकट जाणार! आणि आतां एक नवीनच धास्ती उत्पन्न झाली. पुढच्या वर्षापर्यंत त्याचे डोळे शाबूत राहिले तर पुढचे मनोरथ! त्याला चैन पडेना. एकदां वाटलें बाहुल्या मोठ्या झाल्या आहेत. त्या प्रकाशाला उत्तर देत नाहींत, जवळचें वाचायला दिसत नाहीं आणि डोळयांच्या आंत तर कांहीं बिघडलेलें नाहीं; म्हणजे लेन्स कमी अधिक जाड करणारा स्नायू शिथिल झाला असला पाहिजे. त्याला कामाला जुंपण्याला लावणारा औषधरूपी चाबूक त्याच्या हातांत होता; तसलीं अर्धा डझन औषधें त्याला तोंडपाठ होतीं. पण त्याचा व्यावहारिक उपयोग करणें अशा स्थितींत शक्य नव्हतें! न जाणों कांहीं

भलतेंच झालें तर? हो—समजा, पडद्याचा दाह झाला असला आणि आपण बाहुली व तो स्नायू आकुंचन करणारें औषध घातलें तर ती अगदींच विपरीत चिकित्सा होणार! कारण पडद्याच्या दाहाला बाहुली विस्तृत करणारेंच औषध घालावें लागतें—म्हणजे पडदा एकत्र गोळा केल्यासारखा होऊन तो पुढील लेन्सला भलत्याच ठिकाणीं चिकटून जाण्याची भीति कमी होते.

दुसऱ्या एका प्रख्यात नेत्रवैद्याचा त्यानें सल्ला घेतला पण उपयोग झाला नाहीं. त्यानेंहि पहिल्या डॉक्टरसारखेंच सांगितलें. फरक इतकाच कीं पहिल्यानें कढत बोरीक पाणी घ्यायाला सांगितलें होतें तर यानें थंड बोरिक पाणी उपदेशिलें.

आतां काय करावें? नेत्ररोगविशारदांजवळ देखील एकहि औषध असें नव्हतें कीं त्यानें ताबडतोब—निदान तात्पुरतें त्याला स्पष्ट लिहितां वाचतां येईल! त्या डिग्र्यांचा उपयोग काय? कशाला इतके शिकले! विलायतचे शिके घेऊनहि शेवटीं हीच त्यांची करामत काय? इतका साधा रोग, आणि तो कोणालाहि बरा करतां येऊं नये? निदानच बरोबर झालें नाहीं तर ते तरी काय औषध देणार! तात्पर्य काय कीं किती बढाया मारल्या, शास्त्रीय ज्ञानाची अशी प्रगति झाली आहे, तशी झाली आहे, तरी त्या वल्गना फोलच म्हटल्या पाहिजेत. 'डोळे पुन्हां पाहिले पाहिजेत' हो, पण आज पेपर बुडणार त्याचें काय? उद्यां तुम्हीं दुरुस्त करून द्याल; पण आज दुपारीं १०॥ चा ठोका पडून खण खण खण खण घंटा होईल तेव्हां मी काय करूं? डोळ्याला पट्टा बांधून निजूं? अरेरे! गेली हातची परीक्षा गेली. शिष्यवृत्ति गेली, आणि एक वर्ष गेलें!

घटकाभर असेच विचार त्याच्या मनांत आले पण लगेच त्यानें आपलें मन आवरलें. जगांतील गूढांच्या अनंतत्वाकडे पाहिलें तर रुपयांत दोन आणे देखील अद्याप आपल्या ज्ञानाच्या कक्षेंत आले नाहींत—उगाच कोणाला दोष लावण्यांत अर्थ नाहीं. आपण सर्वज्ञानी आहोंत असें ते थोडेच म्हणत आहेत.

या गोष्टीमुळें तर नेत्ररोगाबद्दल प्रयोगयुक्त अभ्यास करण्याचा त्याचा निश्चय दृढतर झाला. प्रत्यक्ष आंधळ्या मनुष्यानेंसुद्धां शास्त्रीय शोध लावल्याचें उदाहरण नाहीं असें नाहीं. मग मला तर अद्याप दोन डोळ्यांनीं रस्त्यांतून चालण्याइतकें तरी दिसत आहे.

परीक्षेची वेळ होत चालली तसतसा तो अस्थिर होत चालला. एकवेळ जाऊन पहावें-जें होईल तें होईल किंवा एखाद्या तात्पुरत्या जाड आरशीच्या सहाय्यानें पेपर लिहावा असेंहि त्याला वाटलें. पण त्याचे सोबती त्याच्या कल्पनेला हंसले मात्र! त्याच्या मनांत अर्थात् खळबळ उडाली होती. कांहीं दुखत खुपत नसतां तो ईझिचेअरवर विवळत पडला. स्वतःच्या मनगटावरील घड्याळांत किती वाजलें हें त्याला नीट दिसत नव्हतें व म्हणून सारखे 'किती वाजले' आतां किती वाजले 'झाले का १०॥' असें तो सारखा विचारीत होता.

साडेदहा होऊन गेले. जयकर तसाच आराम खुर्चीवर कण्हत पडला होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रु आले पण बोरीक पाण्यांत ते मिसळून गेल्यामुळें कोणाच्या लक्षांत आले नाहींत. आतां तोंडाला व घशाला कोरड पडल्यासारखें वाटूं लागलें.

* * * *

रोगशास्त्र ( पॅथॉलाजी ) पदार्थसंग्रहालयांत दोन विद्यार्थिनी उंच स्टुलावर उभ्या राहून समोरील उंच शेल्फवरील नमुने अभ्यासत होत्या. एकीच्या हातांत सर्व नमुन्याची आंकडेवारीनें दिलेली यादी होती व ती ती मोठ्यानें वाचून दाखवीत होती व दुसरी हातानें एकएक नमुना सरकवून, जवळ घेऊन किंवा गरगर फिरवून स्वतः पाहून दुसरीला दाखवीत होती, पण ती काय पहात होती किंवा दुसरीला दाखवीत होती हें तिचें तिलाच समजत नव्हतें-तिचें चित्त ठिकाणावर नव्हतें.

पहिलीनें वाचलें "नंबर १७५६, मेंदूचा गुळुंब ( ट्यूमर ) हा कोणाला होतो माहित आहे काय ?"

दुसरीनें एक कांचेचें भांडें उचलून म्हटलें, "कोणाला ?"

"कोणाला म्हणजे ? हे ऐटबाज लोक असतात ना-तर्खडसारखे-त्यांना."

तर्खडचें नांव काढतांच दुसरीच्या कपाळाला आंठ्याच पडल्या.

नंतर दोघींनीं तो नमुना नीट पाहिला, पण त्यांतील मूळच्या खऱ्या मेंदूचा भाग कोणता हेंच त्यांना समजेना! पण कशीबशी त्यांनी स्वतःचीच समजूत करून घेतली.

"१७५७-काय असेल ओळख पाहूं!"

"१७५७ ना? शिपायांचं बंड—" असें म्हणून तिनें खोटेंच हंसून विनोद केल्याचा आविर्भाव आणला.

पहिली म्हणते, "मुक्ते, लक्ष आहे कुठं तुझं ? अन् बंद झालं तें १८५७ सालीं. अग, हें मेंदूतील गळूं ( ॲब्सेस ) तुला पण हा रोग झालेला दिसतो !"

त्या दोघींनीं तो नमुना पुनः नीट न्याहाळून पाहिला. पण त्यांतील मेंदू कोणता आणि गळवाचा खड्डा कोणता हेंच त्यांना पुनः ओळखेना.

मुक्ता म्हणाली, "जळळे ते नमुने ! मला तर हा मेंदू आहे का यकृत आहे हेंच ओळखतां येत नाहीं !"

"आपणां दोघींना" पहिली म्हणाली, "उंचवटा ( टयूमर ) कोणता आणि खड्डा ( कॅव्हिटी ) कोणता हें समजत नाहीं."

"जाऊं दे, पुढें वाच" मुक्ता म्हणाली.

"१७५८—छातींतील प्रधान धमनींचा फुगा ( ॲन्युरिझम थोरॅसिक ॲओर्टा )"

"किती नंबर ?"

"१७५८"

"अग प्रेमा, सगळाच घोटाळा केलास. अग ही बाटली आतांच पाहिली कीं."

"वा. !—पाहूं—अग मी घोटाळा केला कीं तूं सगळे चुकीचे नंबर दाखविलेस—तरीच समजेना मेंदू का यकृत. तरी बरं, धमनीचा फुगा आणि पोटाचं कॅन्सर हें तरी तुला एक वाटले नाहींत ! चल—दाखव पुनः पहिल्यापासून '१७५६ हृदयपिष्टीभवन' (फॅटी डीजनरेशन); १७५७ डोळ्याचा सार्कोमा; १७५८ छातींतील प्रधानधमनींचा फुगा. अस्सं, आतां साधारण तरी जमताहे.—हं काढ—१७५९ गुडघ्याचा क्षय—"

"उभं राहून राहून माझ्या गुडघ्यांचा मात्र क्षय होण्याची वेळ आली आहे ! अग मी एकदां नंबर चुकलें अन् मग ओळीनें दाखवीत गेलें. ते सगळेच चुकत गेले. तुला पण ते पटत होते ना ?

"१७६० हृदयविकार—" असं काय करतेस मुक्ते ? मघां गुडघ्याचा क्षय व्हायला लागला आतां हृदयाचा विकार होऊं घातला कीं काय ?"

मुक्तेचें लक्षच आज अभ्यासांत नव्हतें. हृदयविकार हा शब्द ऐकून खरोखरच तिची छाती धुडधडूं लागली. "पुरे गडे. मला आतां कंटाळा आला. उद्यां करूं पुरं."

इतक्यांत छबू लगबग तेथें आली व काखोटीचीं दोन लठ्ठ पुस्तकें एका टेबलावर आपटीत म्हणाली, " न होईल हृदयाचा विकार तर काय! मिस्टर तर्खड पहिल्या वर्गांत पहिले आले!"

होय. मुक्तेला हृदयविकार झाला होता. तिचें चित्त व्यथित झालेलें होतें. १७६० नमुने पाहिले तरी तिला ते सगळे हृदयाच्या विकाराचेच वाटले असते. मेंदू कोणता आणि काळीज कोणतें हें तिला कळेनासें झालें होतें.

तर्खड हुषार मुलगा होता. हुषार तितकाच चाणाक्ष व व्यवहारनिपुण होता. आतांच तोंडी परीक्षा संपली होती व तेव्हांच परीक्षकानें त्याला पहिला आला असल्याचें सांगूनहि टाकलें होतें अशी बातमी लागली! आधींच तो जरा ऐटबाज व गर्विष्ठ होता, त्यांतून आतां यंदाचा तो कॉलेजचा वीरच झाला; मग काय विचारतां! त्यांतल्या त्यांत एक गोम होती.

तर्खड हुषार तर होताच. त्याची हुषारी सर्वांगीण होती. खेळांत, वाद-विवादांत, अभ्यासांत तो कोणाला हार जात नसे. कदाचित् जयकरइतका तो असामान्य बुद्धिमान् नसेल पण आपलें ज्ञान उपयोगी पाडण्याची त्याच्या अंगीं करामत होती. सगळ्यांशीं मैत्री असल्यामुळें त्याला जगांत काय चाललें आहे याची माहिती होत असे व ती तो आपल्या उपयोगांत आणी. उदाहरणार्थ, परीक्षेंत स्वतःच्या बुद्धिमत्तेवर तो जितका अवलंबून असे तितकाच अनुषंगिक गोष्टीवरहि भर देई. जसें, गेल्या वर्षी कोणते प्रश्न आले आहेत, परीक्षकांचा कल काय आहे, त्याच वर्षी त्याच परीक्षकानें दुसऱ्या कॉलेजांतील परीक्षेच्या वेळीं कोणते प्रश्न विचारले होते, विलायतेस यंदा पेपर काय घातले होते, इत्यादि गोष्टींवरहि त्याचा डोळा असे. परीक्षकाच्या खासगी दवाखान्यांत एखादी नवलाइची केस नुकतीच येऊन गेलेली असल्यास त्याच विषयावर एखादा प्रश्न येणें कितपत संभवनीय आहे, गांवांत अगर बंगालमध्यें एखाद्या विशिष्ट रोगाची केस झाल्याचें वर्तमानपत्रांत वाचल्यास, तेंहि तो दृष्टिआड करीत नसे. शास्त्रीय, स्थानिक महत्त्वाची अगर परीक्षकाच्या घरची खाजगी सर्व माहिती गोळा करून त्यावरूनहि तो अंदाज बांधीत असे. तोंडीं परीक्षेच्या आधीं सकाळींच आऊट-पेशंट खात्यांत जाऊन आज विशेष नवलाईचे कोण रोगी आले होते याची बित्तंबातमी काढून ठेवण्यास तो चुकत नसे. असो.

बिंग सांगावयाचें राहिलेंच. जयकराप्रमाणेंच तर्खडलाहि महत्त्वाकांक्षा होती. पण जयकरला ज्ञान मिळवून त्यांत भर घालण्याची आकांक्षा होती तर हें सर्व करून नांव मिळविण्याची तर्खडची उत्कट इच्छा होती. त्यालाहि विलायतेला जायला शिष्यवृत्ति हवी होती. डोळ्यांखेरीज इतर विषयांत तर्खडला पहिलें येतां आलें नसतें असें नाहीं. मनांत येईल त्या विषयांत प्राविण्य मिळविण्याइतकी त्याची कुशाग्रबुद्धि व व्यवहारिक कर्तबगारी होती. पण तीच कांताबाई शिष्यवृत्ति मिळविण्यांत आणखी एक फायदा होता. 'पहिलाच कांता शिष्यवर' ( फर्स्ट कांतास्कॉलर ) ही बहुमानाची पदवी त्याला मिळाली असती-( बिंग अजून पुढेंच आहे ) व मुक्तेचेंहि पाणिग्रहण करण्याची आशा होती. ( कारण कांताबाईच्या मृत्युपत्रांत असें सुचविलें होतें. ) परीक्षा पास होणें, पहिला येणें-त्याच्या हातचा मळ होता. शोध लावण्याकरतां शिष्यवृत्ति मिळविण्याची जयकरची धडपड होती तर मानाकरतां व मुक्तेकरतां शिष्यवृत्ति तर्खडला लाटावयाची होती. शोध लावायला तर्खड अपात्र होता असें नव्हे तर त्याला त्याचें इतकेंसें कांहीं वाटतच नव्हतें. दोघांच्याहि हातून उत्तम कामगिरी झाली असती फक्त 'हेतूं-'चा छल होता. आणि तर्खडचा हेतु तसें पाहिलें तर वाईट नव्हता. मुक्तेसारखी सुंदर आणि गुणी बायकोच त्याला योग्य होती व ती आपल्याला मिळावी असें त्याला वाटलें तर तें स्तुत्यच होतें, त्यांत गैर कांहींच नव्हतें. ही कांहीं कादंबरींतील मुक्ता नव्हती कीं तिजवर गुप्त अगर उघड प्रेम करण्याचा मक्ता फक्त ग्रंथकाराच्या हस्तक-नायकालाच दिलेला असावयाचा! जणूं कांहीं एखाद्या स्त्रीवर खरें प्रेम करणारा जगांत तेवढाच ( नायक ) आहे! आणि बाकीचे सगळे लुचे किंवा 'व्हिलन!' इंग्रजींत ज्याला हेल्दी म्हणतां येईल व मराठींत ज्याला कांहींच म्हणतां यावयाचें नाहीं तशी त्याची मुक्तेशीं विवाह करण्याची इच्छा होती. तो या गोष्टीचा नायक नाहीं, हें जाणून त्याच्या माथीं 'खोटें-बेगडी-विषयी तामसी-नकली' इत्यादि तऱ्हेच्या प्रेमाचा शिक्का मारण्यास आमची प्रवृत्ति होत आहे, पण आम्हीं अत्यंत 'निर्भीड व जबाबदार' टीकाकार असल्याकारणानें तसा विपर्यास आमच्या हातून होणें नाहीं.

जयकर हॉस्टेलमधून आपल्या घरीं रहावयास जाण्याची तयारी करीत होता. तर्खड त्याच्या खोलींत आला त्याचा पोषाख जरी नीटनेटका होता तरी नेहमींसारखा ऐटबाज नव्हता व त्याची वागणूकहि विनयशील दिसली.

" अभिनंदन !" असें म्हणत जयकरनें आपले हात हस्तांदोलन करण्याकरतां पुढें केले.

" माफ कर जयकर !" कष्टी आवाजांत व हात मागें करून तर्खड म्हणाला. " मी तितक्या योग्यतेचा नाहीं."

" म्हणजे ?—हो–बाकी बरोबर. मला कालच समजलं–आतां आमच्या राठ हातांशीं कशाला कराल आंदोलन ! दुवार अभिनंदन केलं पाहिजे. पण या खेपेला आपलं लांबूनच करतों ! शिवाय, तुम्हीं मोठे लोक बुवा. फर्स्ट क्लास फर्स्ट–तेव्हां तुम्हांला आमच्या योग्यतेला कोण बसवील ! कांता स्कॉलर, फर्स्ट कांता स्कॉलर."

" चेष्टा नाहीं. जयकर. मी तुला कांहीं सांगायला आलों आहे. पण तुझे डोळे कसे आहेत ? झाले ना चांगले बरे ?"

" तुम्हींच पहातां—फर्स्ट कांता स्कॉलर हे पहा हे असे आहेत—पहिल्यासारखे. ऐन वेळेला त्यांना काय धाड झाली होती कोण जाणें ! मला तर सगळ्या डॉक्टरांचा, नेत्ररोगमार्तंडांचा सगळ्या मटीरीआ मेडिकांचा आणि औषधांचा राग आला. मीं तीं सगळीं औषधं दिलीं बाटल्यांसह भिरकावून तिसऱ्या मजल्यावरून !"

तर्खडनें एक समाधानकारक सुस्कारा सोडला.

" काय ! औषधं फेंकून दिलीस सगळीं ? राहिली नाहीं ना एखादी बाटली ?" असे म्हणत तर्खडनें सभोंवार नजर फेंकली.

" छे रे ! एक राहिली होती पण तीहि दिली फेंकून. खालीं एक कावळा एका आजारी म्हशीच्या अंगावर टोंचे मारीत होता, त्या कावळ्यावर म्हणून मारली पण बिचाऱ्या म्हशीच्या डोळ्याला लागली—"

" अर्रर्र ! म्हणजे औषध फेंकलें जात असतांहि त्यानें आपला प्रभाव दाखवला !"

" हो, औषधाचा उपयोग आहे खरा ! लोकांचे डोळे फोडण्यांत—" जयकर म्हणाला.

" असें कसें म्हणतोस. मला तर वाटतें औषधानें उपयोग होतो,—माझी खात्री झाली आहे कीं औषधानें उपयोग होतोच होतो. कांहींचा ताबडतोब होईल, कांहीं वेळ घेतील. मात्र त्याची योजना योग्य प्रमाणांत योग्य ठिकाणींच

झाली पाहिजे. मला वाटतें त्या म्हशीच्या ऐवजीं त्या दुष्ट कावळयाचे डोळे त्या बाटलीनें फुटावयास पाहिजे होते."

"म्हणजे एकंदरींत कार्य डोळे फोडण्याचेंच—डोळे सुधारण्याचें नव्हे! त्या दिवशीं सकाळीं मी डॉक्टरनीं सांगितल्याप्रमाणें सारखे बोरीक पाण्यानें डोळे धूत होतों—पण ते उलट चुरचुरायला लागले. दाबून चेपावेसे वाटले पण बोट लागलें कीं अधिकच दुखत. घशाला कोरड पडूं लागली. शेवटीं राग येऊन मी सगळीं औषधें फेंकून दिलीं. आणि आश्चर्य हें कीं तुमचा पेपर लिहून झाला असेल तों मला अमळ बरें वाटूं लागलें. संध्याकाळीं फिरून डॉक्टरकडे गेलों—त्यांनीं तेंच धुणें चालू ठेवण्यास सांगितलें पण मी पुन्हां म्हणून बिंदू घातले नाहींत कीं डोळे धुतले नाहींत आणि नवल हें कीं दुसऱ्या दिवसाला औषधावांचून दृष्टी निवळत चालली. आज आठ दिवस झाले आतां अगदीं पूर्ववत् झाली आहे. सांग तुझ्या औषधाचा गुण का हा ?"

"नाहीं—होय एकाद वेळ होतं असं. पण माझा तर यामुळें औषधावर अधिकच विश्वास बसत चालला आहे. योग्य निदान प्रथम पाहिजे आणि मग त्यावर योग्य औषध. बरं कुठली तयारी चालली आहे ?"

"घरीं जाण्याची. मी आतां घरींच जाऊन रहाणार. मला असें वाटायला लागलें आहे कीं हा कोर्सच सोडून द्यावा. काय अर्थ आहे असल्या निरुपयोगी शिक्षणांत. औषधावरचा माझा विश्वास पूर्ण उडूं पहात आहे. वाटतें शोध नको आणि कांहीं नको !"

"वाः! असं कसं. मग तर जरूर तुझ्या सारख्यानं शोध लावायला पाहिजे. आतां तर तुला अधिकच सबळ कारण आहे. ऐक, मी तुला सांगतों, तात्पुरत्या निराशेनें वेड्यासारखें करूं नको. अफूनें मनुष्य गुंगतो ना ? दारूनें मत्त होतो ना ? झालं तर. म्हणजे कांहीं द्रव्यांनीं शरीरावर परिणाम होतो. होतोच होतो. चिकित्सा मात्र योग्य पाहिजे. कांहीं औषधांचा परिणाम तावडतोब दृश्य होतो, कांहींना आपलें कार्य घडविण्यास वेळ लागतो-मी मघां म्हटलेंच. पण मी आज आलों आहे तो निराळयाच कारणाकरतां. चल आपण वर गच्चीवर जाऊं तुला एकट्यालाच सांगायचं आहे—आतां तुझे सोबती वगैरे येतील. चल."

"काय सांगायचं आहे बुवा इतकं ? चल हवं तर—"

दोघेहि गच्चीवर एकांतांत गेले.

जयकरकडे न पहातांच तर्खड म्हणाला, "मला तुझी क्षमा मागायची आहे—"

"क्षमा ? भले ! ती कशाबद्दल ?"

"जयकर मी तुझा गुन्हा केला आहे–मी फर्स्ट क्लास फर्स्ट आलों खरा, पण मी त्याला अपात्र आहे. ती जागा माझी नव्हे–तुझी."

"अरे त्यांत काय आहे. ती मिळविण्यास तूं सर्वथैव पात्रच आहेस. माझी कशाला त्यांत क्षमा ? माझे डोळे बिघडले त्याला तूं काय करणार ? अन् गुन्हा तो कसला. तूं कांहीं कुठं चोरी केली नाहींस कीं कोणाला वीष घातलं नाहींस–वेडा कुठचा. तुला कांता स्कॉलर झालेला पाहून मला आनंदच होत आहे—"

तर्खड गप्प होता. कांहींतरी गूढ विचारांचें खलबत त्याच्या मनांत चाललें होतें. शेवटीं तो म्हणाला, "जयकर–पण चढाओढीनें स्कॉलरशिप मिळाली तरच ती खरी. मी एकटाच तिच्याकरतां खरं म्हणशील तर म्हणण्यासारखा उमेदवार होतों—मग ती मलाच मिळाली ह्यांत मला भूषण तें काय ? तुझ्याशीं चढाओढ करून मी मागें पडलों असतों तरी त्यांतच मला धन्यता वाटली असती. पण तुझ्या अपरोक्ष पहिला येणं म्हणजे वासरांत लंगडी गाईइतकीच माझी योग्यता." तर्खड कांहींतरी सांगायला कचरत होता असें त्याच्या मुद्रेवरून व हावभावावरून वाटलें. "तुला कळलेंच आहे कीं मुक्ता आतां—"

"इतकें सांगायलाच का मला तूं वर एकीकडे आणलेंस ? चार–चौघांत सांगायला मला वाटतें कांहींच हरकत नव्हती." जयकर जरा संतापून म्हणाला. त्याला वाटलें आपल्याला ऐट दाखवायला आपल्याला हिणवायलाच आज तर्खड आला आहे. "तसें म्हटलें तर ही गोष्ट सगळ्यांनाच माहीत आहे. ती तूं मला एकांतांत नेऊन सांगण्याची गरज नव्हती–" अभिमान ज्योत जयकरच्या अंतःकरणांत पेटून तिच्या ज्वाला अशा बाहेर पडूं लागल्या. "आधींच होरपळलेल्या माझ्या अंतःकरणावर असे डाग देण्याकरतांच तूं मला वर आणलंस काय ?"

"तूं त्या अर्थानें घेत असशील तर माझा नाइलाज आहे. मी क्षमा मागतों. आणखीहि मला कांहीं सांगायचं होतं–अगदीं गुप्त असं–पण ज्या अर्थी तुझं

मन संतप्त झालं आहे त्या अर्थी इतक्यांतच सांगत नाहीं–वेळ आलीच म्हणजे सांगेन. सध्यां गुड् बाय्."

परीक्षेचा निकाल लागला.

तर्खड पहिल्या वर्गांत पहिला आला खरा पण कांताबाई शिष्यवृत्ति कांहीं त्याला मिळाली नाहीं. कारण तो परीक्षकांच्या पूर्ण कसोटीस उतरला नाहीं! तोंडी परीक्षेंत त्याला 'ॲट्रोपीनचा ग्लॉकोमामध्यें उपयोग आणि दुरुपयोग' याबद्दल विचारण्यांत आलें होतें पण त्याचें उत्तर त्याला नीटपणें देतां येईना. वास्तविक प्रश्न तसा अवघड नव्हता पण काय असेल तें असो हा प्रश्न ऐकतांच तो बिचकला होता व भांबावून त्याला शिस्तवार उत्तर देतां आलें नव्हतें. मुक्ता हातची गेली!

एकीकडून त्याला बरें वाटलें. कांहीं तरी गोष्टीसंबंधीं त्याचें मन त्याला खात होतेंसें दिसलें!

कांताबाई शिष्यवृत्ति जरी त्याला मिळाली नाहीं, तरी सर्व परीक्षेंत पहिला नंबर पटकावल्यामुळें त्याला त्याकरतां ठेवलेली दुसरी एक शिष्यवृत्ति द्यावी अशी परीक्षकांनीं शिफारस केली होती व त्याप्रमाणें ती त्याला मिळालीहि. डोळ्यांचाच अभ्यास करण्याचें ठरवून तो विलायतेस गेला.

मुक्तेची मधल्यामध्यें विलक्षण स्थिति झाली. जयकरला शिष्यवृत्ति मिळणार यांत कोणालाच संशय नव्हता. प्रथमपासूनच तिनें जयकराच्या हुषारीबद्दल कीर्ति ऐकली होती व त्याबद्दल तिचें चांगलें मत झालें होतें. तर्खडच्या हरएक कलाकुसरीबद्दलहि तिला आदर होता पण तो अमळ गर्विष्ठ आहे अशी तिची समजूत होती. त्याच्या अंगीं विनयशीलता–ती कर्टसी नव्हती. कारण त्याच्या अंगीं जात्याच आत्मविश्वास होता. लाथ मारीन तेथें पाणी काढीन अशी त्याची हिम्मत असल्यामुळें त्याच्यांत एक प्रकारचा उद्दामपणा आला होता; व म्हणूनच त्या नाजूक दृष्टीनें मुली त्याकडे पहात नसत, तर त्याची त्यांना एकप्रकारें केव्हां आदरयुक्त–तर केव्हां तिरस्कारयुक्त भीतिच वाटे.

ज्या चष्म्यानें पहावें तसें दिसतें. इतके दिवस तर्खडचें नांव काढलें कीं तिच्या भिवया वक्र होत. पण आतां मनु पालटला होता. तर्खड पहिल्या वर्गांत पहिला आला. शिष्यवृत्ति त्याला मिळाली. एका वर्षानें तो एक मोठी पदवी घेऊन परत येणार व मोठा हुद्देदार होणार. ती त्यावेळीं पास झालेली

असेल. तर्खडच्या मनांत आपल्याशीं लग्न व्हावें असें आहे हें तिला माहीत होतें. पण त्याला आपल्या आईची शिष्यवृत्ति मिळाली नव्हती. अर्थात् त्याच्याशीं लग्नाची गोष्ट काढणें शक्य नव्हतें, व त्यानेंहि त्या बाबतींत एक अवाक्षरहि काढलें नाहीं. तो विलायतेला निघूनहि गेला. एकादी वस्तू मिळत नाहीं असें दिसलें की तीच हवीशी वाटूं लागते. तसेंच या बाबतींत झालें. आपल्याच मनाशीं ती विचार करूं लागली. मनुष्याला धमक पाहिजे व आपल्या कर्तृत्वाचा अभिमानहि पाहिजे. अभिमानाच्या अतिरेकाला आपण चुकून गर्व म्हणतों. व्यस्त प्रमाणांत अभिमान असला म्हणजेच तो गर्व. पण ज्याला कर्तृत्व अधिक त्याला त्या प्रमाणांत अभिमान असावयाचाच. ज्याला त्याच्या गुणांची पारख नाहीं त्याला तो पोकळ अभिमान वाटेल व त्या अभिमानाला तो गर्व असें संबोधील. खेळण्यांत, वक्तृत्वांत, अभ्यासांत सगळ्यांत तर्खड प्रवीण होता. तसा कांहीं जयकर नव्हता. तो एकलकोंडा व फक्त पुस्तकांत डोकें घालून बसणारा होता. आणि त्याची " आजची किंमत " काय होती ? त्याचे डोळे दुखरे होते. पुढल्या वर्षीं तरी तो शिष्यवृत्ति मिळवील कीं नाहीं कोण जाणे. आणि मिळविली तरी तो वस्तुतः पहिला कांता स्कॉलर कसा होणार ? कारण एका दृष्टीनें पहिली शिष्यवृत्ति कोणालाच न मिळाल्यामुळें 'पहिला' कांता स्कॉलर कोणींच नव्हता ! !

मुक्ता तसें म्हटलें तर लहानच होती व वरील विचार तिच्या डोक्यांत न जाणून आले तर तें साहजिक होतें. ती कांहीं स्वर्गातून अवतरलेली कादंबरींतील 'खरी आर्यस्त्री' नव्हती ! ! तर आईच्या कुसेंतून आलेली एक साधारण मुलगी होती.

इकडे जयकरचे डोळे सुधारेनात. औषधें घातलीं, खुपऱ्या भाजल्या, कापून काढल्या, पण कांहीं नाहीं. खुपऱ्या बुबुळावर घासून बुबुळेंहि खडबडीत झालीं व त्यामुळें त्याला कमी कमी दिसूं लागलें. भयंकर जाड व वेडीवांकडी अशी एक आरशी लागणें प्राप्त झालें. मुंबईच्या हवेंत अधिक राहाणें इष्ट नव्हतें. लेखन–वाचनानें डोळे अधिकच बिघडणार होते. अखेर आपल्या वैद्यकीय शिक्षणाला व एकंदरींत सर्वच वाचनाला कायमचा रामराम ठोकून त्याला स्वस्थ घरीं बसावें लागलें. त्याच्या डोळ्यांच्या यातना, त्याच्या मनाची व्यथा याचें वर्णन कल्पनेनेंच करावें. खुपऱ्यांवर रामबाण सज्ज करण्याच्या आंतच

शत्रूनें त्याच्यावर चाल करून आघाडी मारली. हें धर्मयुद्ध नव्हतें पण त्याला इलाज नव्हता !

आपण यंव करूं त्यंव करूं असे शोध लावूं ही सगळी महत्त्वाकांक्षा रसातळाला गेली ! मधून जरा डोळे बरे होत पण पुन्हां त्यांना काम पडलें कीं बिघडत.

* * * *

एक वर्ष गेलें. तर्खड एक भली मोठी डिग्री घेऊन परत आला. बंदरावर उतरतांना त्याच डिग्रीइतकी उंच व धिप्पाड अशी एक मडम त्याच्या बरोबर होती. तिचें नांव सौ. तर्खड. पण हें कोणालाच माहीत नव्हतें !

* * * *

" जयकर, मी तुला हिणवायलाहि आलों नाहीं किंवा माझी ऐट सांगण्याकरतांहि आलों नाहीं. मागें तूं रागावला होतास म्हणून मी गोष्ट अर्ध्यावर सोडली होती. आज वेळ आली आहे, म्हणून सांगतों. मला येऊन आठ दिवस झाले तुला समजलेंच असेल. परवां मुक्तेच्या भावानें तिच्या लग्नाची गोष्ट काढली. पण मी पापी आहें. मी तुझा अपराधी आहें. क्षमा कर. शिष्यवृत्ति मला मिळाली नाहीं हें योग्यच झालें. माझी ती योग्यता नव्हती. मुक्तेशीं लग्न करण्यासहि मला आतां अखत्यार नाहीं. क्षमा मागण्याला मला तसेंच कारण आहे. तूं म्हणालास कीं ' क्षमा कसली ? तूं कांहीं चोरी केली नाहींस कीं कोणाला वीष घातलं नाहींस !' पण चुकलास मीं दोन्ही केलीं. मी हॉस्पिटलमधून ॲट्रोपिनचें पाणी चोरून आणून तुझ्या बोरीक पाण्याच्या बाटलींत भरून ठेवलें ! दचकूं नको. पश्चात्तापासारखें प्रायश्चित्त नाहीं. त्यानेंच तुला परीक्षेच्या दिवशीं एकाएकीं दिसेनासें झालें. तोंडी परीक्षेंत मला 'ॲट्रापीनचा ग्लॉकोमांत दुरुपयोग ' हा प्रश्न विचारला. हाय ! मी अन्य कारणाकरतां ॲट्रोपीनचा दुरुपयोग केला ही गोष्ट मला एकदम आठवून मी भांबावलों. मला पॉइंट्स् तोंडपाठ होते पण माझें चित्त वेड्यासारखें होऊन मला सरळ उत्तरहि देतां आलें नाहीं. नाहीं तर मला शिष्यवृत्तीहि मिळाली असती. पण तुझ्या अभावीं; तुझ्याशीं चढाओढींत नव्हे ! आतां मी सगळें ओकून टाकलें आहे. आज वर्षभर माझ्या मनांत तीं गोष्ट डाचत आहे. केव्हां सांगेन असें झालें होतें. केलीस ना क्षमा. मी तिलाहि पात्र नव्हतों आणि तिलाहि नाहीं.

औषधानें शरीरावर परिणाम होतोच होतो असें मी कां म्हटलें तें आतां तुझ्या लक्षांत येईल."

किंचित् हंसून पण शांतपणें जयकर म्हणाला. "तर मग उलट तूंच कांता स्कॉलर व्हायला लायक दिसतोस. कारण डोळ्यांवर परिणाम करणाऱ्या औषधांची तुला माहिती आहे इतकेंच नव्हे तर त्याचा व्यवहारिक उपयोगहि आपलें कार्य साधण्याकरतां—तुला फक्कड करतां आला. जगांत पुष्कळ नैसर्गिक शक्ति आहेत पण त्या मनुष्याच्या उपयोगीं पडण्यास लावण्याचं अकलेचं काम आहे. तूं दुरुपयोग केलास इतकंच ! आणि मी असा गाढव कीं इतकं साधं निदान मला करतां आलं नाहीं. डोळ्यांत ॲट्रोपीन गेल्यामुळें आपल्याला दिसेनासं झालं आहे इतकं साधं निदान ज्याला करतां आलं नाहीं तो कांताबाई ऑप्थालिमक रिसर्च स्कॉलर व्हायला कसा पात्र असणार ?"

"जयकर—आतां लावून बोलूं नको. तुझंच ध्येय मी पुढें ठेवणार. आणि खुपऱ्या संबंधींचा अभ्यास हातीं घेणार आणखी काय म्हणत होतों मी ? जरा मी कांता स्कॉलर झालों असतों तरी तो अशा नीचपणाच्या लुच्चेगिरीनं तेव्हां मुक्तेला कांहीं मी योग्य नाहीं. परवांच तिच्या भावानं विचारलं, पण मी नाहीं म्हटलं. तूं तिच्याशीं लग्न कर. ती कबूल आहे. कारण—"

जयकर आश्चर्यानें पाहूं लागला.

"कारण मी विलायतेंत असतांच लग्न केलं—मिसेस तर्खड हॉटेलांत उतरल्या आहेत."

"नाहीं. मला लग्न करायचं नाहीं, केव्हांच करायचं नव्हतं आणि आतां तर नाहींच. बऽऽरं. माझं कपाळ दुखतं आहे मी स्वस्थ पडतों."

आणि मुक्ता ? तर्खडशीं लग्न करणें अशक्य होतें, व जयकराचा लग्न न करण्याचा ठाम निश्चय होता.

परीक्षा आली, व गंमत अशी कीं मुक्तेनेंच आपल्या आईची शिष्यवृत्ति उपटली ! तीच पहिली कांता स्कॉलर झाली ! ज्या अभ्यासामुळें तिनें शिष्यवृत्ति पटकावली त्या अभ्यासाशींच तिनें लग्न लावलें !

तिघेहि संगनमतानें खुपऱ्याचा अभ्यास नेटानें करीत आहेत. त्यांच्या प्रयत्नांना तरी यश येवो !

---

# वर्णांध

—•• ••—

"उषा !" चित्रकलेच्या मास्तरीणबाई अंमळ कठोरपणें म्हणाल्या, "हें काय रंगवलंस हें ?"

उषा डेस्कवर ड्रॉइंगचें पुस्तक ठेऊन रंगीत चित्रें काढीत होती. उजव्या हातच्या पानावर एक गुलाबाचें फूल काढलें होतें व त्यांत ती कुंचल्यानें रंग भरीत होती. तिनें दचकून वर पाहिलें.

"हें काय गुलाबाचं फूल ? हिरवा रंग असतो वाटतं गुलाबाच्या फुलाला ? वेडी नाहीं तर ! लक्षच नाहीं मुळीं ! बाकी काढलं आहेस उत्तम. देठाला हिरवा रंग ठीक आहे पण आपला तोच फाशीत जायचं वाटतं सगळया फुलाला ! काढ पुन:." मास्तरीणबाई पुढच्या मुलीकडे जात म्हणाल्या, "तो काय हिरवा चाफा आहे वाटतं ?"

उषा ओशाळली–गोंधळली. तिनें त्या देठाच्या रंगाकडे पाहिलें व फुलाच्या पाकळयांच्या रंगाकडे पाहिलें. "मी तर बरोबर भरला आहे गुलाबी रंग !" असें उत्तर तिच्या ओंठावर आलें होतें. रंगपेटिकेंतील ज्या वडींतून ओला करून ती रंग उचलीत होती त्या वडीकडे तिनें पाहिलें तों त्या वडीच्यावर "फिकट हिरवा" असें इंग्रजींत लिहिलें होतें ! पेटिकेंतील "गुलाबी" वडी तिनें शोधली व 'अर्रर्र खरंच' असे शब्द अर्धवट तिच्या तोंडून बाहेर पडले. व गुन्ही मनुष्याच्या दृष्टीनें तिनें चोरून बाईकडे पाहिलें. 'लक्षच नाहीं मुळीं' असा बाईंनीं टोमणा मारला होता. उषेचें मन ठिकाणावर नव्हतें ?

त्या मास्तरीणबाई होत्या म्हणूनच त्यांच्या ती चूक लक्षांत आली. एखादा तरुण, अविवाहित उल्लू पण रसिक कविमास्तर असता तर तो उषेच्या गुलाबी गालाकडेच पहात रहाता व 'वा: ! काय छान फूल रंगवलं आहे' असें वाटून ड्रॉइंगच्या वहींतील हिरव्या गुलाबाकडे त्याचें लक्षच गेलें नसतें. देवानें भरलेला रंग आणि मनुष्यानें थेबाडलेला रंग यांत जमीन अस्मानाचें अंतर असणारच. उषेच्या गुलाबी गालांतच तो शाहीर गुंग झाला असता असें नव्हे

तर गालावरून, चाफ्याच्या कळीप्रमाणें दिसणाऱ्या तिच्या नाकाकडेहि त्याची चंचल पण काव्यदृष्टि गेली असती. ड्रॉइंगच्या वहींतील गुलाबाला हिरवा रंग दिल्याचें जसें त्याच्या लक्षांत आलें नसतें तसेंच तिच्या नाकाच्या चांफेकळीला हिरवा रंग नसल्याचें पण त्याला कांहीं वाटलें नसतें.

उषेनें काढलेलें गुलाबाचें फूल खरोखर अप्रतिम वठलें होतें. रंगांत नाहीं तरी आकृतींत तें तिच्या गालाशीं स्पर्धा करीत होतें. कारण तिचे गाल भरलेले असले तरी गुलाबासारखे गुबगुबीत व टपोरे नव्हते. त्या फुलांत तिनें हिरवा रंग भरला नसता तर तें एक अप्रतिम पांढरें गुलाबाचें फूल म्हणून शोभलें असतें किंवा हिरवें रंगविलेलें तें फूल पाहून असें वाटलें असतें की विश्वकर्म्याला हिरवा गुलाब बनविण्याकरतां ती नमुनाच तयार करीत आहे. तें कलम केल्यासारखें देठाचें खालचें तिरपट टोंक, त्या देठाचा तो बांक, पानांतील रंगाच्या त्या विविध छटा, दुमडल्यासारखें वळलेलें एक पान, तुटक्या फांदीचा तो बुडखा, पानाच्या शिरा, आणि पाकळ्यांची ठेवण–सर्व कांहीं तिच्या स्वतःच्या देहाला लाजविण्यासारखें होतें. खरें पहातां खरोखरच्या फुलापेक्षां ( फोटोप्रमाणें ) हें रेखांकित फूलच अधिक नयन–मनोहर वठलें होतें. एखाद्या वनस्पतिशास्त्रज्ञालाहि त्या पुस्तकांतील तें फूल पाहून असें वाटलें असतें कीं हें खरोखरचें फूलच यांत नमुना म्हणून दाबून चिकटवून ठेवलें आहे. पण इतकें तरी खोट्या अभिमानानेंच त्यानें कबूल केलें असतें. कारण चिकटविलेलीं नमुन्याचीं फुलें सपाट झालेलीं जुनकट व विकृत असतात व या फुलाला तर निरनिराळ्या छायाछटांमुळें स्पष्ट उठाव दिसत होता. व तें नुकतेंच खुडल्यासारखें ताजें दिसत होतें.

पुन्हां दुसऱ्या पानावर फूल काढावें लागणार याचें तिला कांहींच वाटलें नाहीं. कारण हा तिच्या हातचा मळ होता, पण आपल्या हातून अशी घोडचूक झाल्याबद्दल तिला वाईट तितकेंच आश्चर्य वाटलें. इतक्यांत तास संपल्याची घंटा झाली व तिचें वाईट वाटणें, आश्चर्य व हिरवा गुलाब तितकाच राहिला.

* * *

कालच मॅट्रिकचा निकाल लागला होता. "अहिल्या जोशी पास झाल्याचं तुम्हांला कळलंच असेल." भय्यासाहेब उषाताईला म्हणाला.

" हो. पेढेसुद्धां खाल्ले." उषा हंसत म्हणाली.

" हुशार दिसते. नाहींतर हल्लींच्या काळीं परीक्षा मोठ्या कठीण झाल्या आहेत."

मानेला हिसडा देऊन उषा उत्तरली, " तें तर खरंच. पण हल्लीं या मॅट्रिक अन् बी. ए. बायका पैशा—पासरी झाल्या आहेत. जी उठते ती बी. ए. होते. पण बी. ए. होऊन या काय मिळवणार ?"

" काय मिळवायचं ? ज्ञान."

" कर्माचं ज्ञान ! या युनिव्हर्सिटींत खरं आणि उपयोगी ज्ञान मिळतं का तरी ? एरवीं व्यवहारांत हुषार होणाऱ्या माणसाला या तुमच्या युनिव्हर्सिट्या कायमच्या निरुपयोगी मात्र करून टाकतात. या बी. एं. चा, देशाला कांकणभर तरी उपयोग आहे ?"

" कां नाहीं ? शिक्षण म्हटलं म्हणजे फायद्याचंच असतं. आतां या शिक्षणाची दिशा जरीं चुकलेली असली तरी मुळींच न शिकण्यापेक्षां आहे त्याच शिक्षणाचा फायदा करून घेणें वाजवी नाहीं का ? आणि हें शिक्षण तुम्हांला पसंत नसेल तर त्यांत बदल करून घेणें आपल्याच हातीं आहे.

" नांवाला हातांत आहे. पण म्हणतात ना. लोकमत तयार नाहीं. लोकांत जागृतिच नाहीं. आणि लोकप्रतिनिधी नुसते खुर्च्या अडवणारे त्यापेक्षां आमच्या बायकांच्या युनिव्हर्सिटींत पहा. हें पोपटपंची निरुपयोगी गुऱ्हाळी शिक्षण मुळींच नसतं. बायका उत्तम गृहिणी कशा होतील इकडे लक्ष पुरविलं जातं. आणि त्या अनुरोधानंच त्यांना शिक्षण देण्यांत येतें—"

" सैंपाकाचं—" डोळे मिचकावीत भय्यासाहेब म्हणाला.

" अलबत् सैंपाकाचंसुद्धां."

" आणि पोतेरं घालण्याचं—"

" हो हो. पोतेरं घालण्याचं—"

" आणखी कांहीं ? उंदरांचीं बिळं लिंपणं–ढेंकूण निवडणं—"

" हें काय हें ? तुम्हाला नुसती थट्टा करायची असली तर बोलणंच राहिलं. पण मी कांहीं हटायची नाहीं. बोहऱ्याला जुने कपडे देऊन भांडीं घेणं, मोरी घांसणं, आजाऱ्यांच्या ओकाऱ्या काढणं."

" नवऱ्याचे जोडे पुसणं—"

"ता जर उ[illegible]ड्यांत लोळणारा असला तर तेंहि आलंच."

"एवंच काय कीं खरं शिक्षण फक्त तुमच्या संस्थेच्या शाळा-कॉलेजांत मिळतं."

"अर्थात्."

"बाकीच्या मुली सगळ्या गाढव."

"असं कांहीं मी म्हणत नाहीं! कारण गाढवं ओझ्याला तरी खंबीर असतात. पण यांच्या हातून तेंहि व्हायचं नाहीं. या बी. ए. म्हणजे मरतमढी असावयाच्या. बी. ए. होईपर्यंत दुसऱ्यांची मदत यांना लागावयाची व बी. ए. झाल्यावर "बी. ए." म्हणून गडी-नोकर पाहिजेतच. लुगडें धुवायला गडी पाहिजे, कांदे देखील गड्यानें चिरावयाचे. कुंकू द्यायला मोलकरीण पाहिजे आणि पोरें पाजायला आया. बाळंतपणाला हॉस्पिटल आहेच. कारण यांच्या घरांत अव्यवस्था, नात्याचें मनुष्य नको आणि आलें तरी टिकावयाचें नाहीं. राहिलें साहिलें नवऱ्यानें करावयाचें मग यांनीं करावें तरी काय? फक्त जगावयाचें. अशा या बी. एचा जगाला राहोच पण देशाला किंबहुना नवऱ्यालाहि उपयोग काय? मुलांची दैना तर पुसूंच नका."

"बी. एं. च्याबद्दल तूं भलताच गैरसमज करून घेतलेला दिसतोस. मॅट्रिक—प्रीव्हिअस्पर्यंत सर्वसामान्य ज्ञान व पुढें वैशेषिक ज्ञान असा बी. ए. चा अभ्यासक्रम आहे. मॅट्रिक—प्रीव्हिअस झालेली मुलगी कोणत्याहि विषयाचा विशेष अभ्यास करण्यास तयार केली जाते. व पुढें आयुष्यांत जी कामगिरी करावयाची असते तिचा फक्त पाया येथें घातला जातो. तुमच्या संस्थेची मॅट्रिक किंवा जी. ए. परिपूर्ण असते. 'जी. ए., हें साध्य तुम्हीं समजतां व तीन वर्षांत तें तुमच्या हातीं येतें. 'बी. ए.' हें साधन मात्र आहे, व खऱ्या कामगिरीला बी. ए. झाल्यानंतरच आरंभ व्हावयाचा असतो व जन्मभर टिकवायचा असतो. जिला—तिखट मीठा—पुरतें ज्ञान पाहिजे तिनें खुशाल 'जी. ए.' व्हावें. पण पुढें जिला अमुक एक कार्य करावयाचें असेल तिनें राजमान्य युनिव्हर्सिटीची मॅट्रिकची परीक्षा देणेंच जरूर आहे. नाहीं तर तिला युनिव्हर्सिटीला जोडलेल्या कॉलेजांत कोण घेणार? आणि ती वकील, डॉक्टरीण होणार कशी? फार तर तुमच्या मॅट्रिकला तुमचीच जी. ए. होतां येईल. व त्याकरतांहि पुण्यास व फक्त पुण्यासच तिला रहावें लागणार."

" पण ही कांहीं दिवसांचीच अडचण आहे. आणि प्रत्येकीला वकील डॉक्टरीणच का व्हायचं असतं ?"

" प्रत्येकीला नव्हे. पण ज्यांना व्हायचं आहेच त्यांना ? शिवाय कित्येकींचें ठरलेलें नसतं. किंवा पुढें अडचणी येतात. आतां ज्या मुलीचं ध्येय जी. ए. होण्याचंच खास ठरलं असेल तिनें मात्र तुमच्या संस्थेंत पहिल्यापासून शिकायला हरकत नाहीं. पण तितक्या वयांत कांहींच कायम ठरवणं शक्य नसतं. पुढें परिस्थिति बदलते. व मागाहून पश्चात्तापांत पडल्यासारखें नाहीं का होणार ? कारण युनिव्हर्सिटीची मॅट्रिक तुम्ही आपल्या कॉलेजांत घेतां पण तुमची मॅट्रिक मात्र तिकडच्या कॉलेजांत खपणार नाहीं. तेव्हां पहिल्यापासून सावध असणं बरं नव्हे का ?"

थोडा वेळ उषा गोंधळली. " पण हा कांहीं दिवसांचाच प्रश्न आहे. आप-ल्याला त्यांचीच वकिलीची अगर डॉक्टरची पदवी कशाला पाहिजे ? आपलीं देशीं कॉलेजं काढलीं पाहिजेत."

" खरं. पण तुमच्या डिग्र्यांना विचारतो कोण ? फार तर तुमच्या तुमच्यांत अशा पदवीधर तुम्ही खपवाल. पण बाहेरगांवीं त्यांना कोण विचारणार ? अशांना वकिलीची सनद कोण देणार ? आणि अशा डॉक्टरणींचें सर्टिफिकीट कोठें चालणार ? तुम्हीं पुष्कळ हुषार असाल-युनिव्हर्सिटी पदवीधरापेक्षा शहाण्या असाल पण तें जगाला कळायला काय मार्ग ? राजमान्यतेशिवाय कांहीं नाहीं. उद्यां मी एक गिनी बनविली आणि त्यांत भेसळ न करतां सबंध १०० नंबरी सोन्याची केली तरी जोंवर तिच्यावर राजाचा शिक्का नाहीं तोंपर्यंत तिला गिनी कोण म्हणणार ? ती बाजारांत कशी खपणार ? खरें पहातां ती खऱ्या गिनीहून अधिक मौल्यवान् आहे पण लोकांना काय माहीत ? ज्याला प्रत्यक्ष माहिती आहे तोच मात्र तिची किंमत जाणणार. व तो ती घेईलहि. बाजारांत ती गिनी म्हणून चालणार नाहीं इतकेंच नव्हे तर तें अमुक इतकें सोनें म्हणूनहि-परीक्षा केल्याशिवाय-कोणी त्याला हात लावणार नाहीं. फार काय, सोनें म्हणून सांगितलें तर उलट लोकांना गिलीटाच्या तांब्याचाच संशय यावयाचा. हीच गत तुमच्या पदवीधरांची. खऱ्या गिनीइतकी त्यांची किंमत असेल, किंबहुना १०० नंबरी सोन्याइतक्या त्या मूल्यवान् अस-तील-कोणाला माहीत !—कदाचित् रोल्डगोल्डच्या सेफ्टी पिन्स असतील ! रागावूं नको."

" मी रागावत नाहीं. तर मला तुमची कींव येते. कोणतीहि गोष्ट एकदम होत नसते. भवभूतीनें म्हटल्याप्रमाणें आज जरी आमच्या कन्याशाळेला कोणी विचारलें नाहीं तरी कालांतरानें खरी संस्कृति जाणणारे व शिक्षणाचें खरें स्वरूप ओळखणारे महात्मे जन्मास येतील व मग कन्याशाळेंत जाण्याकरतां मुलींची अहमहमिका लागेल. सरकारी किंवा सरकारमान्य शाळेंत जाणें कमीपणा वाटूं लागेल. आणि तुमच्या बी. ए. ना आमच्या जी. एं. चा हेवा वाटूं लागेल. सरकारी डिग्री मिळविलेल्या मुलींकडे होतकरू नवरेमुलगे नाक मुरडून पहातील आणि त्यांचे आईबाप हिंगण्याला खेट्या घालून दमतील."

" असे महात्मे मला वाटतं फक्त तुम्हां जी. एं. च्या पोटींच आले तर! पण राजमान्यतेचें काय?"

" राजमान्यता? चांफ्याचा वास झांकत नाहीं. साधु असतात ते राजाकडे जात नाहींत. राजांना गुणगुण लागली कीं ते त्यांच्या दर्शनाला धांवतात. तरी पण राजा न आला तरी साधूचें अडत नाहीं."

" कारण त्याला कांहीं करावयाचें नसतें! पण तुम्हांला तर संसार करायचा आहे—देशकार्य करावयाचें आहे. ही साधूची उपमा मात्र घसरली."

" मग तुमची गिनीची उपमा पण चूक आहे. कन्याशाळेचा कांहीं बाजार मोडला नाहीं! ज्याला आमची योग्यता प्रत्यक्ष कळत नसेल त्यानें आमच्या वाटेस जाऊं नये व आम्हीं पण त्याच्या वाऱ्यालासुद्धां उभ्या राहणार नाहीं." उषा रागानें लाल झाली.

" हें काय? रागावूं नको. शब्दांचा उगीच छल करूं नको. तुला आपल्या संस्थेबद्दल इतका अभिमान आहे हें पाहून मला अगदीं आनंद होतो. पण नुसतें भावनामय बनून चालणार नाहीं. व्यवहार पहा."

" मी भावनामय असलें तरी व्यवहारशून्य नाहीं. किंबहुना व्यवहार आम्हां मुलींनाच अधिक समजतो. कारण आमचं शिक्षणच तसं आहे. आम्हीं पुस्तकांतले किडे नाहीं."

" आणि म्हणूनच मी त्या शिक्षणाला कमी समजतों. एकदम व्यवहार शिकवून उपयोगी नाहीं. आधीं मूलभूत तत्त्वं समजलीं पाहिजेत. म्हणजे कोणत्याहि अडचणीच्या प्रसंगीं योग्यायोग्य गोष्टींचा निश्चय होतो. ज्याला धोपट मार्ग माहीत आहे तो थोडें कोठें कांहीं चुकलें कीं बिथरतो. त्याला

दिशेचें वगैरे ज्ञान नसल्यामुळें त्याला दुसरा मार्ग सांपडत नाहीं. पण आधीं ज्याला दिशेचें ज्ञान झालें त्याला रस्ता माहीत नसला तरी घर सांपडतें. तुमच्या शाळेंत फक्त रहातें घरच बांधायला शिकवतात व तेवढीच सामुग्री तुमच्याजवळ असते. पण सरकारी शाळेंतील मुलीजवळ जमीन, लांकूड, लोखंड, कांच, दगड, विटा, शिमीट, झावळी वगैरे सर्व साहित्य दिलेलें असतें. व जिला जें आवडेल तसलें घर ती बांधते. मग कोणी विटांचें रहातें घर बांधील, कोणी दगडाचें हॉस्पिटल बांधील किंवा संगमरवरी दगडाचें देऊळ बांधील. वेळ प्रसंग पडल्यास झावळी व तट्टयाची झोंपडी उभारील कारण ती सर्व साधनांनीं युक्त असते. पण तुम्हांला विटांचे टुमदार घर तेवढें बांधावयाचें माहीत. विटा नसल्या किंवा मंगलोरी कौलें नसलीं तर तुमचें अडणार! कारण सांचा तुम्हांला माहीत. ज्याप्रमाणें एखादा मोटार साफ करणारा असतो तो मोटार लख्ख ठेवतो व हांकणारा ऐटींत हांकतो, पण यंत्रांतला एकादा स्क्रू ढिला झाला तर मात्र त्याला दुरुस्त करतां येत नाहीं. कारण त्याला सशास्त्र माहिती नाहीं. ज्याला यंत्राची माहिती नाहीं तो उत्तम ड्रायव्हर असूं शकेल पण कांहीं बिघडल्यास तो कुचकामाचा होईल. तेंच ज्याला यंत्रांचीं पूर्ण माहिती आहे पण अजून हांकतां येत नाहीं त्याला न शिकवतां आपण होऊन सहज हांकतां येऊं लागेल. तुम्हांला पाकशास्त्र शिकवतात. शिवण-टिपण शिकवतात. पण त्यांत येवढें शिकण्यासारखें काय आहे? मी कांहीं पाकशास्त्र शिकलों नाहीं पण मला स्वयंपाक करतां येतो ना? घरकामांत शिकायचें तें काय? भूगोल, युक्लिड, रसायनशास्त्र, खगोलशास्त्र वगैरेंची मूलभूत तत्त्वें जो शिकला त्याच्याजवळ पुढें व्यवहारांत लागणारीं सर्व साधनसामुग्री जमलेली असते. व वारा येईल त्याप्रमाणें तो शीड उभारूं शकतो."

"मी तर म्हणेन कीं हें आमच्याच शिक्षणाच्या दिशेला अधिक लागूं पडतें. तुम्हांला आमच्या शाळेची कांहीं माहिती नसतां तुम्हीं बोलतां. जे गुण म्हणून सांगितलेत तें आमच्या संस्थेंतच आहेत. अगदींच उलटं चित्र रंगविलंत तुम्हीं. आमच्या संस्थेंत शास्त्राचीं मूलतत्त्वें शिकवून तें व्यवहाराच्या कामीं कसं लागूं करावयाचें तें शिकवितात—इतकं नव्हे पण तें आमच्याकडून करवून घेतात. तुम्ही उगीच विचारपूस केल्याशिवाय, प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय कांहीं तरी बोलतां. खरी खुबी कशांत आहे माहीत आहे? संसारांतल्या साध्या

गोष्टी—कांहीं त्या गोष्टी—मुद्दाम शिकण्यासारख्या नसतील—म्हणजे तुम्ही म्हणाला त्याप्रमाणें त्या शिकण्याची जरूरी नसेल. पण रहस्य त्यांतलं हेंच कीं, नुसतं पुष्कळ माहीत असून उपयोग नाहीं तर त्या प्रत्यक्ष करतां आल्या पाहिजेत व केल्या पाहिजेत. म्हणजे तुम्ही पोतेरं घालण्याचं म्हणाला. पोतेरं घालायला शिकायलाच नको असलं तरी वेळ आल्यावर तें घातलं पाहिजे! आजाऱ्याची ओकारी प्रत्यक्ष काढली पाहिजे—मन कचरतां कामा नये. कशी काढावयाची हें नुसतं माहीत असण्यांत काय मातब्बरी? तुम्ही श्रीमंत असाल. दासी—बटकी तुमच्या घरीं असतील. पण सगळयांच्याच घरीं नसतात. वेळ पडली तर कोणतेंहि काम असेना-प्रत्यक्ष केलं पाहिजे. खरं इंगित यांतच आहे. आणि श्रीमंती झाली तरी केव्हांना केव्हां प्रसंग येतोच. त्यावेळीं पाय मागें घेतां कामा नये. हातून झालं पाहिजे. याला वळण लागतं."

"मी कबुल करतों. तुमची शिक्षणाची दिशा अगदीं योग्य व आदर्शभूत असेल पण माझे दोन मुद्दे रहातातच. ज्यांना पुढें वकील डॉक्टरीण व्हायचं आहे त्यांचा व ज्यांना परगांवीं नोकरी करावयाची असेल त्यांचा. म्हणजेच मान्यता. आणि-सांगूंच का? मला माहीत नाहीं हो-पण आपली ऐकिव बातमी—"

"मग नकाच सांगू ती ऐकीव बातमी सपशेल खोटी आहे असं समजा. कोणा तरी दुष्ट व हेवा करणाऱ्या माणसानं तुम्हांला सांगितली असेल."

"ऐकून घेणाच्या आधींच?"

"हो. आधींच. आमच्या शाळेची निंदा माझ्यासमक्ष मी ऐकून घेणार नाहीं."

"पण मी निंदा करीत नाहीं. ऐकीव गोष्ट विचारतो. शहानिशा करून घेण्याकरतां. कदाचित् तो आरोप खरा असेल तर?"

"पण तो आरोप मुळीं खोटाच असणार. कारण आमच्या शाळेंत नांव ठेवण्यासारखें कांहींच नाहीं."

"मग बोलणेंच खुंटले. हा कांहीं न्याय म्हणत नाहीं. हेंच का तर्कशास्त्र शिकलीस."

"कुत्सित माणसांच्या बोलण्यावर आम्हीं वादविवादहि करीत नाहीं व त्यावर तर्कटहि रचीत नाहीं."

"पण तें माणूस कुत्सित कोणी ठरवायचं."

"ताजमहालांत दोष काढणारा कुत्सितच असला पाहिजे."

"पण तो ताजमहाल कशावरून ?"

"कारण तो आहेच ताजमहाल म्हणून."

"वा: ! हा खूप कोटिक्रम आहे. आधीं ताजमहाल हें गृहीत धरायचं, त्याचा कुत्सितपणा गृहीत धरावयाचा आणि मग त्याच्या म्हणण्याचा विचारच करावयाचा नाहीं ?"

"मूलसिद्धांत तो मूलसिद्धांतच. तो गृहीतच धरलेला असतो."

"आतां मात्र हटलों !" आलें त्यापेक्षां जास्त हंसून भय्यासाहेब म्हणाला.

*　　　*　　　*　　　*

आरंभीं लिहिलेल्या रंगकामाच्या तासांतील हकीगत याच्याच दुसरे दिवशीं घडली.

*　　　*　　　*　　　*

एके दिवशीं सायंकाळीं उषा टेंकडीकडे फिरावयास गेली. लकडीपुलाच्या पुढें गेल्यावर उषेला आडव्या वाटेनें भय्यासाहेब जात असतांना दिसला. त्याच्याबरोबर एक हिरव्या पातळाची बाई तिला दिसली. ही कोण असेल ? होय ही अहिल्याच. अहिल्या नेहमीं पातळें नेसत असे. एक हिरवें व एक मूळचें मोतीया रंगाचें पण आतां विटून पांढरट झालेलें. तिला आश्चर्य वाटलें. कारण भय्यासाहेबांची व अहिल्येची ओळख होती—तिच्या भावाशीं दाट मैत्री होती—तरी दोघांनीं एकटें सहल करायला जाण्याइतकी मुळींच नव्हती. थोडा वेळ थबकून तिनें पाहिलें व ती हलक्या पावलानें वाट चालूं लागली. अहिल्या सरकारी मॅट्रिक होती व भय्यासाहेबांना सरकारी डिग्री प्यार होती. कालच त्यांचा त्याबद्दल वादविवाद चालला होता. असूयेनें प्रथमच तिच्या मनांत चंचूप्रवेश केला. चालून तिच्या गालावर अगोदरच लाली आली असल्यामुळें आणखी आलेली लाली पहाणाऱ्याच्या लक्षांत आली नसती. शिवाय तिचे गाल कितीहि लाल असते तरी तिच्या स्वरूपाला ते नैसर्गिकच वाटले असते. पण असेल कांहीं तशाच कारणानें कदाचित् दुसरें कोणी असेल, कारण इतक्या लांबून नीट दिसत नव्हतें, असा तिनें स्वतःला फसविण्याकरतांच कीं काय कयास काढला.

आपली दृष्टि मंद असतां आपण आरशी वापरीत नाहीं याचें तिला पहिल्यानेंच वाईट वाटलें. कारण आरशी लावणें म्हणजे फॅशन आहे व ती सरकारी

व निमसरकारी शाळा–कॉलेजांतील देशद्रोही व चटोर पोरींनींच लावावी अशी तिची ठाम समजूत होती. साधेपणाला, देशभक्तीला आरशी शोभत नाहीं. किंवा आरशी लावल्यास आपल्या भिंवयांचा मनोहर बांक, डोळ्यांतील पाणी व चांफेकळीचा देंठ उठून दिसणार नाहींत अशीहि तिला भीति वाटत असावी. लोक दिसावे, म्हणून आरशी घालावयाची कीं लोकांना दिसावी म्हणून आरशी घालायची हें अद्याप तिला कोडें होतें, पण आजच हें कोडें थोडेंसें उकललें.

ती पुढें गेली व एका पुलावर बसली. तितक्यांत भय्यासाहेब आले. प्रथम ती हिरव्या पातळाची बाई कोण असें त्यांना विचारावेंसें तिला वाटलें पण योग्य संधि साधून विचारण्याचें तिनें ठरविलें. वास्तविक विचारण्यास कांहींच हरकत नाहीं. पण असूयेचें व संशयाचें पटल नुकतेंच येऊन गेल्यामुळें तिला धीर होईना.

इकडच्या तिकडच्या गोष्टींत बराच वेळ गेला. तितक्यांत मामा व अहिल्याहि तेथें येऊन थडकलीं. तिनें पाहिलें तों तेंच तें हिरवें पातळ. ते येथें कसे आले असतील याची तिनें आपल्या मनाशींच गोष्ट रचली व संशयाला बळकटी आल्यामुळें तिला 'ती हिरव्या पातळाची कोण' तें विचारण्याचा धीरच झाला नाहीं, व जरूरीहि नव्हती.

अहिल्येचे डोळे थोडे बिघडले होते व तिनें आरशी घेतली होती पण आरशीवांचून विशेष अडत नसल्यामुळें ती केव्हां केव्हां आळसानें व निष्काळजीपणामुळें घालीत नसे, पण डोळे अधिकच बिघडतील या भीतीनें ती शक्य तेव्हां आरशी घालीत असे. कारण तिच्या मनांत पुढें पुष्कळ शिकावयाचें होतें व त्याकरतां डोळ्याची काळजी घेणें जरूर होतें.

अहिल्या आणि उषा मैत्रिणी होत्या. पण दोघींच्याहि मनांत एकमेकींबद्दल हेवा होता. ह्या हेव्याला हेवा म्हणण्यापेक्षां स्पर्धा म्हणणें रास्त होईल. पण ही स्पर्धा केव्हां केव्हां हेव्यावर येऊन उतरे. आज अहिल्या जरा वरच्या पायरीवरून उषेकडे बघत होती व उषा काहींशा चमत्कारिक दृष्टीनें अहिल्येकडे पहात होती. त्यांत हेवा होता. त्यांत स्पर्धा होती. तूं मॅट्रिक झालीस तर माझाहि उद्याच रिझल्ट लागून मी पण कन्याशाळेची मॅट्रिक होणारच आहे असा तिला आत्मविश्वास होता.

संभाषण चालू असतां अहिल्या म्हणाली, "छट्! मी पुढें शिकणार, बी. ए. होणार. इतिहास व अर्थशास्त्र घेऊन बी. ए. व्हायचं मी ठरवलं आहे. कारण हेच विषय हल्लीं आम्हांला फार उपयोगी आहेत. राजकीय व सामाजिक चळवळींत भाग घ्यायला याचं ज्ञान अवश्य पाहिजे. समाजशास्त्र पण मी शिकणार."

"पण लग्नाशिवाय समाजशास्त्र कळणार कसं?" उषा म्हणाली.

"हं: ! तुझ्यासारखी मी कांहीं लग्नाला हपापलेली नाहीं. शेंपूट तुटलेला कोल्हा."

"मग समाजशास्त्र कीं फमाजशास्त्र शिकून करणार काय?"

"लग्न करण्याकरतांच शिकायचं काय?"

"अलबत्! शिकल्याप्रमाणें वागून दाखविण्यांतच खरें शहाणपण व मोठेपणा आहे. नाहींतर तुम्ही सुशिक्षित व्हाल पण सुसंस्कृत होणार नाहीं. ज्ञानयोगी व्हाल पण कर्मयोगी होणार नाहीं आणि कर्मयोगहीन लोकांचा देशाला उपयोग काय? करून दाखविलं पाहिजे."

"पण मी कुठं पण केला आहे कीं मी केव्हांच लग्न करणार नाहीं? मी शिकणार, शिकवणार व वागणार. बाकी लग्न न करतां कांहींच करून दाखविण्यासारखं नसतं असं नाहीं." अहिल्येनें म्हटलें.

"तो गौण पक्षच. मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं. लग्न झाल्याखेरीज–संसार केल्याखेरीज समाजशास्त्र किती घोकलं म्हणून कळणार थोडंच?" उषा म्हणाली.

"म्हणजे?" भय्यासाहेब मध्येंच म्हणाला "लग्न म्हणजे मरणाचं द्वार कीं काय?"

"हें तुमचं तर्कशास्त्र वाटतं?" उषेनें टोमणा दिला. "एका दृष्टीनें मरणाचंच द्वार. बालिशपणा, आप्पलपोटेपणा, स्वैरविहार यांना लग्नामुळें मूठमाती मिळते. विवाह म्हणजे या सगळ्याचा त्याग. माझ्या मतें संसार म्हणजे एक स्वार्थत्याग शिकण्याची मोठी शाळा आहे. कारण आतां दोन जीव असतात. पुढें वाढतात. व देश जरी विसरला तरी आपल्याच कुटुंबाकरतां एकमेकांना एकमेकांकरतां हरघडी स्वार्थत्याग करण्याचा प्रसंग येतो."

"मला वाटलें होतें" मामा मध्येंच म्हणतो "लग्न म्हणजे मजा आहे."

" पण मला तरी इतकी धास्ती बाळगायला नको. कारण आमचें बोलणें चाललें होतें–उषेशीं लग्न झाल्यावर मला गडीमाणूस ठेवायला नको. तीच म्हणत होती कीं कन्याशाळेंतल्या मुलींना भांडीं घासायला, कांदे चिरायला गडी लागत नाहीं. लुगड्याची घडी करायला मोलकरीण लागत नाहीं–आणि... आया पण नको !—"

" तर तर ! " एकदम उसळून उषा म्हणते, " सेनापतीला बंदुक मारतां येते पण तो कांहीं गोळ्या झाडीत बसत नाहीं ! तुम्हांला पट्टी बांधतां येते पण तुम्हीं कांहीं पट्ट्या बांधीत बसत नाहीं. आमच्या कन्यांना शिकवतां येतें पण ते कांहीं वर्ग घेत बसत नाहींत. पण त्याच सेनापतीनें शिपाई असतांना गोलंदाजी केली आहे, तुम्हीं कॉलेजांत पट्ट्या बांधल्या आहेत व अण्णासाहेबांनीं क्लास घेतले आहेत. आणि वेळ आली तर तो सेनापती बंदूक पण चालवील, तुम्हीं पट्ट्या बांधाल व अण्णा वर्ग घेतील. बिनीचा देखील घेतील." किंचित् थांबून ती म्हणाली, " आणि नोकर–चाकर नसले तरी त्यालाहि माझी कबूली आहे. पण त्यामुळें होणारी बचत तुम्हीं आमच्या संस्थेला देणार असाल तर—"

" म्हणजे मोलकरणी तयार करण्याचीच संस्था म्हणायची ! नाहींग बाई ! बरं झालं मीं कन्याशाळेची नाहीं मॅट्रिक झालें ! नाहींतर माझ्या सासरच्या माणसांनी मला 'सर्टिफाईड'–पास झालेली–मोलकरीण असा किताब दिला असता—" अहिल्या थट्टेनें म्हणाली.

" ताई !" किंचित् दटावून मामा म्हणाला, " कांहीं जिभेला हाड ! थट्टेत चुकून सुद्धां असं म्हणूं नये. दुसऱ्यांच्या भावनांचा विचार करावा."

" हा पहा यांच्या शाळेंतील संस्कृतीचा मासला." 'यांच्या'वर जोर देऊन उषा म्हणाली.

" उषाताई " भय्यासाहेब म्हणाला " तूंहि तीच संस्कृति दाखविलीस."

थोडा वेळ कोणींच बोललें नाहीं.

विषय बदलण्याकरतां भय्यासाहेब म्हणाला " कायरे मामा, सोशिऑलॉजी म्हणजे आहे तरी काय ?"

" सोशिऑलॉजी म्हणजे समाजशास्त्र."

" हो, पण म्हणजे काय ? त्यांत असतं तरी काय ?"

**मामाः**—" त्यांत ? अरे हेंच. समाजाबद्दल शास्त्र. शास्त्र म्हणजे काय ? पद्धतशीर ज्ञान किंवा अभ्यास. आणि समाज म्हणजे तुम्ही आम्ही. समाजशास्त्र म्हणजे आपलाच अभ्यास."

**भय्यासाहेबः**—" तुझ्या कर्माचा अभ्यास !"

**उषाः**—" कदाचित् एखाद्या लेखकानें आपल्या चौघांच्या कर्माचा अभ्यास करून त्यावर एखादी गोष्टहि लिहिली असेल. काय ग ? तूंच सांग ना समाजशास्त्र म्हणजे काय तें " ( हें अहिल्येला उद्देशून )

**अहिल्याः**—"सोशिऑलॉजी म्हणजे तुम्हींच सांगितला ना आत्तां उषाबाई संसाराचा अभ्यास–संसार म्हणजे स्वार्थत्यागाची सोशिकपणाची शाळा. लॉगॉस म्हणजे जाणणें. सोशिऑलॉजी म्हणजे सोशिकपणाचा अभ्यास."

**मामाः**—" म्हणजे, त्यांत सोशिकपणा लागतो वाटतं ? इतकी का ती परीक्षा अवघड आहे ? म–म–मला नकोरे बाबा."

" पुढें ?" भय्यासाहेब अहिल्येला उद्देशून म्हणाला.

**अहिल्याः**—" पुढें काय ? समाज कसा उद्भवला, विवाह म्हणजे काय, खानेसुमाऱ्या, धर्म व समाजबंधनें, जाति व कर्म, जनन, सर्व कांहीं त्यांत येतं."

**मामाः**—अबब ? इतके आणि अवघड विषय. सोशिकपणाची कमाल दिसते या शास्त्रांत. पण काय ग त्यांत होशील का तूं पास ?"

" काय झालं न व्हायला ?" अहिल्या म्हणाली.

" —काय झालं." मामा डोळे मिचकावीत म्हणाला, " हो ! मुलं थोडीं, आणि परीक्षक ओळखीचे. त्यांतून बाई. मॅट्रिकसारखी तीहि होशील."

किंचित् रागानें अहिल्या उत्तरली. " ही कांहीं कन्याशाळा नाहीं ! !"

त्याचवेळीं भय्यासाहेबांच्याहि तोंडून पुढील शब्द निघाले. " कन्याशाळा आहे वाटतं ती ?" व कांहींतरी वाटून ते खोंखों हंसले.

**मामाः**—" ताई ! ! भय्यासाहेब ! !"

उषा रागानें लाल झाली. ही थट्टाहि तिला झोंबली. तिच्या नाकपुड्या फुरफुरूं लागल्या. भिंवयाला आठ्या पडल्या. तिनें अहिल्येकडे व भय्यासाहेबां-कडे पाहिलें–दोघेहि गालांत चोरून हंसत एकमेकांकडे पहात होती !

त्यांना खाऊं कीं गिळूं असें तिला झालें. हा तिचा वैयक्तिक अपमान तर होताच पण त्यांत तिच्या आवडत्या मायसंस्थेवर विनाकारण शिंतोडे होते.

काय बोलावें सुचेना. कारण पुष्कळ रागाचे शब्द तिच्या ओंठावर आले होते व त्यांतल्या त्यांत क्षणक्षणीत पण उच्चार करण्यासारखे कोणते ते ती निवडीत होती.

सर्व खजील झाले. सभा यापुढें चालविणें अशक्य होतें. व तें लक्षांत आणून मामा म्हणालेः "उषाताई, ताई, भय्यासाहेब, हें बरें नव्हे. सरसकट विधानं करूं नयेत. चालायचंच. तुम्हांला हेंच समजत नाहीं. मॅट्रिक असो नाहीं तर कन्याशाळा असो. आपापल्या संस्थेबद्दल तुम्हांला इतका आदर अभिमान प्रेम आहे हें स्तुत्य आहे यांत शंका नाहीं. पण सहसा राखून बोलावं. वेळ आली तर मात्र माघार घेऊं नये. दुसऱ्यांच्यावर राग काढण्यांत शक्ति खर्चू नका. तर आपापलें ध्येय गांठण्याकडे करा. त्यांतच परस्परांचा फायदा आहे. पाय रगडले तर त्यांना अधिक चापल्य येतें. कोरडी जमीन झाडली तर अधिकच धूळ उडते. ओली करून झाडावी. तुम्हां दोघींनाहि ही खुबी माहीत आहे. पण त्याप्रमाणें कोणींच वागत नाहीं. जाऊंद्या. चला उशीर झाला. झाली गोष्ट मनांत मात्र कोणींच ठेवूं नका. ही सगळी थट्टा आहे. व ती थट्टा म्हणूनच आपण घेतली पाहिजे."

मामा उठला. सगळेच उठले. चालतांना मामा शिटींत एक श्लोक म्हणत होता. त्याला शिटी नीट वाजवतां येत नव्हती; पण तें वृत्त ओळखतां येत होतें इतकेंच नव्हे तर '**परिहास विजल्पितं सखे। परमार्थेन न गृह्यतां वचः॥**' हे शब्द सुद्धां शिटी बोलत होती.

शिटी थांबवून मामा म्हणाला, "मग, उद्यां तुमचा रिझल्ट ना? चैन आहे सध्यां आमची. रोज पेढे.–हो काय करतां–येईल त्या संकटाला तोंड तर दिलं पाहिजे!" मुद्दामच त्यानें शिळी कोटि केली.

लकडीपूल आला. मामा म्हणाला. "या पुलावरून मला एक गम्मत सुचली आहे. या पुलाच्या एका बाजूला मोकळी हवा आहे पण व्यापारधंदा नाहीं व दुसऱ्या बाजूला व्यापारधंदा आहे पण मोकळी हवा नाहीं. हा पूल यांना जोडण्यास अगदींच चिंचोळा आहे. दोन्ही भागांत अधिक दळणवळण सुलभ करण्याकरतां हा पूल रुंदावला पाहिजे व आणखी पूल बांधले पाहिजेत. थोडा व्यापारधंदा बाहेर आणला पाहिजे व बरीच मुबलक हवा आंत सोडली पाहिजे. तर त्यांतच पुण्याचं वैभव आहे. तसंच सरकारी शाळा आणि कन्याशाळा यांचं आहे."

भय्यासाहेब म्हणाला, " मुबलक हवा आंत सोडली पाहिजे हें मला कबूल आहे पण आंतला व्यापार बाहेर आणणें मला गैर दिसतें !"

" डाक्टरच तुम्हीं ?" अहिल्या म्हणाली.

पण या कोणत्याच बोलण्याकडे उषेचें लक्ष नव्हतें. आगबोटींतील एंजीन ज्याप्रमाणें अंतराकडे लक्ष न देतां गरगर फिरत रहाते तद्वत् वाटेकडे लक्ष न देतां उषा चालत होती.

* * * *

उषेच्या घरीं तिच्या सहाध्यायिनी जमल्या होत्या. त्यांपैकीं दोघी बाहेर गॅलरींत उभ्या होत्या. तितक्यांत दोन तरुण त्यांच्या दारावरून चाललेले दिसले.

मथुरा म्हणाली, " दुर्गा, तो पाहिलास का हिरवट रंगाचा कोट घातलेला मनुष्य–तो–दोघं सूट घालून चाललेत त्यांपैकीं–ते बघ सायकलच्या दुकानापुढें आले—"

" हां–तो हिरव्या नेकटायचा ना ?" दुर्गानें विचारलें.

मथुरा एव्हांना गॅलरींतून आंत आली होती. तिच्या पाठोपाठ येऊन दुर्गानें विचारलें, " का–काय त्याच्याबद्दल ?"

" तो कॅप्टन आहे––"

तोंच हा शब्द कानावर पडल्याबरोबर उषेला ओळखलें कीं कॅप्टन भय्यासाहेबच आपण पास झाल्याबद्दल अभिनंदन करायला येत आहेत. ती गॅलरीकडे गेली व कोण कोण म्हणाली. दुर्गानें म्हटलें " तो हिरव्या टायचा मनुष्य चालला आहे ना गेला पुढें–त्याबद्दल मथुरा कांहीं सांगणार आहे."

उषेनें पाहिलें तों ते सूटवाले लांब पुढें निघून गेले होते. पण तितक्यांत त्यांपैकीं एकानें मागें वळून कायसें पाहिलें. तिला हिरवा टाय दिसला–पण हे तर भय्यासाहेबच ! मग ते पुढें का गेले ? क्षणभर ती थांबली. त्याच्याबद्दल मथुरा काय सांगते तें ऐकण्याची तिला प्रबळ इच्छा झाली. कारण उषा व भय्यासाहेब यांच्या लग्नाचें जरी मथुरेला माहीत होतें. तरी भय्यासाहेब तिनें पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें. ती सातारला असे.

" काय, काय त्याच्याबद्दल ?" उषेनें उत्कंठेनें विचारलें.

" कांहीं नाहीं तो फार गुणी आहे."

" कसा."

" गूण उधळतो म्हणून,"

" कसें." अधीरतेनें उषेनें विचारलें.

" कादंबरींत व्हिलन कसा असतो—"

" व्हिलन ?" उषेच्यानें पुढें ऐकवेना. " मुळींच नाहीं."

" नाहीं काय ? तुला काय माहीत ? ऐकून तर घेशील ? ह्यानें आजपर्यंत–कॉलेजांत असल्यापासून, बॉरवर असतांना–नाहीं नाहीं ते चारगट चाळे केले आहेत. तो अति वाईट मनुष्य आहे. बाहेरख्याली, दारुड्या, फसव्या, लफंगा, दुर्गुणांचा तो उकिरडा आहे."

उषेला कसेंसेंच वाटूं लागलें. त्याच्याशीं आपले लग्न ठरलें आहे असें सांगून मथुरेला इषारा द्यावा काय ? पण आतां फार उशीर झाला. इतके त्याबद्दलचे गुण ऐकल्यानंतर सांगून काय फायदा. उलटा कमीपणा थायचा आपल्याला. ती म्हणाली, "मुळींच नाहीं. हें खोटं आहे."

"खोटं ? तुझा लागतो कीं काय तो कोणी ? तुला काय माहीत. मी त्याच्याबद्दल माहिती सांगण्याऐवजीं तूंच आम्हांला सांग."

"हो. मला तो ऐकून माहीत आहे. व तो फारच भला मनुष्य आहे असं मी ऐकलं आहे. हुषार, चलाख, खेळाडू आणि सच्छील—"

"ओहोहो ! खूपच माहिती आहे तुला. खुळी ग खुळी. येवढ्यानं काय झालं आहे ? मी म्हटलें तो खुशाल दारू पिईना ! आणि उकिरड्यांत लोळेना ! पण दुसऱ्यांच्या मुलींना फसवायचं म्हणजे काय ? यानं आतांपर्यंत तीन मुलींना फसविलं आहे—"

उषेला आपण काय ऐकतों असें झालें. तीन मुली. यांपैकीं एक मी आणि एक अहिल्या तर नाहीं ? मथुरेला माहीत असून ती उगीच अज्ञानाचं सोंग–आपल्याला वेळींच सावध करायला–आणीत आहे कीं काय ? आणि तिसरी कोण ? कोण बरं असेल. मथुराच तर नाहीं ?

मथुरा पुढें म्हणाली, "या चोरानं माझ्यावर नजर ठेवली होती–मागणी घातली होती–पण बरं झालं वेळेवर डोळे उघडले व त्याचें नांव टाकलें. पहिल्या प्रतीचा हलकट आहे तो."

"म्हणजे तो ऐकला तसा चांगला नाहीं."

"तें पहा काय तें."

"खरंच का?"

"खरंच तर-पण काग तो वाईट असला तर तुला काय त्याचं?-का-त्याच्यावर मन—"

"छट! माझं मन चुकूनसुद्धां अशा माणसावर जाणार नाहीं. पण कायग, मी तर त्याला चांगला सभ्य समजत होतें."

"होय. नाटकांतले व्हिलन पहिल्या चार अंकापर्यंत नायिकेला असेच सद्गुणी सच्छिल व प्रेमळ दिसतात. पण पांचव्या अंकाचा पहिला प्रवेश उघडला कीं त्यांचें बेंड हळुहळू बाहेर पडूं लागतें व शेवटच्या प्रवेशांत त्यांचें नाक ठेचतें. हें नाटकांतलं झालं. पण व्यवहारांतला व्हिलन कित्येकदां अखेरपर्यंत टिकाव धरतो व त्याचीच शेवटीं सरशी होते. गेलंच असलं प्रेम-बीम तर पांचव्या अंकाच्या आरंभींच काढून घे हो! नाहींतर त्याची सरशी होईल आणि तोंडघशी पडशील! त्या तीन मुलींच्या जन्माचं वाटोळं किंग या मेल्यानं केलं!"

आज उषेतर्फे परिक्षेचा निकाल लागलेला. तिच्या मैत्रिणीहि पास झालेल्या तिच्या येथें जमून थट्टा-मस्करी करीत होत्या. पण त्यावर मथुरेनें असें नकळत विरजण घातलें. उषेला पुष्कळ वाटत होतें पण तिनें दाबून ठेवण्याचा प्रयत्न केला. "काय? हा पांचव्या अंकाचा आरंभ काय?" असें ती आपल्यालाच विचारीत होती.

नाहीं, हा पांचव्या अंकाचा आरंभ नव्हता तर शेवटचा प्रवेश होणार होता, असें तिला आढळून आलें. पांचव्या अंकाच्या पहिल्या प्रवेशाचा पडदा परवांच उघडला गेला होता-तिचें व भय्यासाहेबाचें सरकारी व कन्याशाळा याबद्दल 'भांडण' चाललें असतां. तो वादविवाद किंवा 'शिळोप्याच्या गप्पा' होत्या तरी तें भांडणच होतें असें तिला वाटूं लागलें. काल संध्याकाळीं दुसरा प्रवेश झाला. सीन-टेंकडीच्या रस्त्यावरील पूल व आज शेवटच्या प्रवेशाचा पडदा उघडला. आतां 'हा सूर्य व हा जयद्रथ' असें कांहींतरी एक घाव दोन तुकडे करावयाचे तेवढे राहिले होते. पापाचें माप त्याच्या पदरांत टाकून त्याचें नाक टेचावयाचें उरलें. म्हणजे या नाटकाची परिसमाप्ती होणार होती. व ती नाटकांतल्याप्रमाणें हें 'नाटक' करण्याचें तिनें ठरविलें. त्याला व्यवहारांतील व्हिलन होऊं देण्याचें तिनें साफ नाकारलें.

फिरून फिरून तिला शंका येई. भय्यासाहेबांची ती उमदी मूर्ति डोळ्यापुढें दिसे, त्यांची चालण्याची ढब, बोलण्याची ऐट, वागण्याची तऱ्हा, त्यांचा मर्दानी पण सभ्य आवाज, त्यांना लष्करांत मिळालेली वाहवा, त्यांचें प्रेम.

पण लगेच तिला मथुरेचे शब्द आठवावे "व्हिलन असेच वाटतात." नाहींतर पहिल्याच अंकांत त्यांचें बिंग फुटून सगळेंच नाटक आटपायचें!

भय्यासाहेबहि व्हिलनप्रमाणें नकली प्रेमच करीत होते? नकली बोल बोलत होते? आतांपर्यंत त्यांनीं तीन मुलीं जगांतून उठवल्या होत्या. व अहिल्या चवथी आणि उषा पांचवी होणार काय? अहिल्येचें माहीत नाहीं. पण एकेका अंकाला एकएक बळी पडल्या तरी पांचव्या अंकांत मी मात्र खरपूस समाचार घेणार! करूं दे, अहिल्येशींच त्यांना लग्न करूं दे. म्हणजे-तिचाहि नक्षा उतरेल–छेः! पण अहिल्येला सावध केली पाहिजे. किती केलं तरी ती स्त्रीजातीची आहे. अत्यंत पवित्र व मंगल अशा स्त्रीजातीची आहे. मला तिची चीड आली, हेवा वाटला, तरी त्याला मी तिला फसवूं द्यायची नाहीं. तिचा पाडाव मी करीन, पण तिच्याहून अधिक चांगलें कांहींतरी करून करीन. मी कन्याशाळेंतली आहे. तो जर व्हिलन असला तर तिला मी उपनायिका करून तिलाहि वांचवून व तिच्याहून शौर्य गाजवून मी स्वतः हिरॉइन होणार.

या विचारानें त्या दुःखांत, पश्चात्तापांत असूयेंत व रागांतहि तिला निराळेंच बळ आलें.

* * * *

त्याच दिवशीं रात्रीं तिनें कॅप्टनसाहेबांच्या नांवानें एक पत्र खरडलें. तिची मनःस्थिति जरी कोरून लिहिण्यासारखी व शब्द तोडून वाक्यरचना करण्या-सारखी नव्हती तरी तिनें कच्च्या तर्जुम्यावरून एक पक्कें पत्र लिहिलेंच. कारण खोडाखोडीचें व अशुद्ध आणि अरसिक पत्र आपल्या हातून जाणें हें तिला कमीपणा आणणारें वाटलें. पत्र पुढीलप्रमाणें होतें.

"...पत्र लिहिण्यास कारण इतकेंच कीं नाटकांतील पांचवा अंक उघडला आहे व व्हिलनचा नीचपणा उघडकीस येऊन त्याला शासन होण्याचें राहिलें आहे. मी हिरॉइन आहे व माझे डोळे लख्ख उघडले आहेत. अतःपर आपला संबंध तुटला. तुम्ही पत्र लिहूं नका किंवा घरींहि येऊं नका. हें माझें शेवटचें

पत्र आहे. कन्याशाळेंतील मुली असल्या लोकांशीं मैत्री ठेवीत नाहींत, त्यांच्या वाऱ्यालाहि उभ्या रहात नाहींत.

उषा रानडे".

कॅप्टनसाहेबांना उषेच्या घरीं झालेल्या व्हिलन वगैरे गोष्टीबद्दल अर्थात कांहींच माहिती नव्हती व उषेच्या मनांतील हिरॉइन होण्याबद्दलचे विचार त्यांना कळणें शक्यच नव्हतें, पण त्या गोष्टी लक्षांत न घेतां उषेनें रागाच्या भरांत आपल्या पत्रांत त्याबद्दल उल्लेख केला होता. अर्थात् त्या पत्राचा कॅप्टन-साहेबांना कांहींच बोध होईना. व्हिलन काय आणि नाटक काय? ही हिरॉइन कोण? कांहींच उलगडा होईना. पण पत्रांतील मजकूर स्पष्ट होता. "अतःपर आपला संबंध राहिला नाहीं." अर्थात् या नाटकांतील गुंतागुंती नीट कळली नाहीं तरी नाटकाचें तात्पर्य त्यांना उमगलें. प्रथम त्यांना ती थट्टा वाटली. पासाच्या आनंदोत्कर्षांत मुलें–मुली जो कित्येकदां वेडगळपणा व अचरटपणा करतात त्यापैकींच हें 'नाटक' असावें अशी प्रथम त्यांनीं स्वतःची समजूत करून घेतली. पण त्यांत अर्थ नव्हता. काय करावें त्यांना सुचेना. या नाटकां-तील हीरो व्हावें असें त्यांना वाटलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आशा-भंग झालेल्या प्रेमवेड्यासारखी त्यांची स्थिति झाली येवढें सांगितलें म्हणजे पुस्तकाचीं पानें व वाचकांचे श्रम वांचतील.

निरनिराळे विचार त्यांना आले. काय कारण असेल? अनेक तर्क करून ते गोष्टी जुळवूं लागले. कोणी तरी तिच्या मनांत आपल्याबद्दल कांहीं तरी विष पेरलें असलें पाहिजे. कोण बरें असेल? किंवा आपलेंच कांहीं चुकलें? परवांच्या वादविवादांत तिला लागण्यासारखें तर आपण कांहीं बोललों नाहीं. कां तिच्या कन्याशाळेची आपण चेष्टा केलेली तिला लागली? अहिल्येबद्दल तर तिला संशय आला नाहीं? अशीहि शंका एकवार त्यांना आली. पास झाल्यामुळें मी तिला कमी पडलों कीं काय? मी रंगानें काळा आहे–दिसण्यांत चांगला नाहीं—

पण त्याच्या स्वरूपांतील हें वैगुण्य पूर्वीपासूनच उषेला माहीत होतें. त्यांत नवीन समजलेलें कांहीं नव्हतें. त्याच्यांत बदल नव्हता. तथापि उषेंत बदल झाला होता. ती मॅट्रिक झाली होती.

भय्यासाहेबानें बऱ्याच विचाराअंतीं खिन्न अंतःकरणानें पुढील पत्र लिहिलें. पत्र इंग्रजींत होतें. "प्रिय उषा! तुझ्या पत्रानें माझें अंतःकरण फुटून गेलें!

माझ्या हातून काय चूक झाली हेंच मला समजत नाहीं. पुन्हा पुन्हा आठवण केली तरी इतका अक्षम्य अपराध माझ्या हातून कोणचा झाला असेल याचा मला मुळींच उलगडा होत नाहीं. मला लाज वाटेल असें कोणतेंहि कृत्य माझ्या हातून आजपर्यंत घडलें नाहीं. तुझे शब्द मला अत्यंत लागणारे आहेत. या तुझ्या टाकून बोलण्याचें कारण काय? तें मला कळेल का? म्हणजे गैरसमज दूर होईल. पुष्कळ लिहावेंसें वाटतें पण कारण कळल्यावर लिहीन. तुझ्या स्पष्टीकरणाची वाट पहाणारा

भय्यासाहेब बापट

**ता. क.** मला कांहीं सुचत नाहीं. माझ्या मनाची भयंकर स्थिति झाली आहे. उलटटपालींच पत्र पाठव अगर भेटण्यास परवानगी दे. भेटण्यासच परवानगी दे.

भ. बा."

या पत्राचें उत्तर उषेच्या मनांत मुळींच लिहिण्याचें नव्हतें. किंबहुना तें पत्र फोडावयाचेंहि नाहीं असें तिनें प्रथम ठरविलें पण कांहींतरी वाटून तिनें तें फोडलें व वाचलें. तिनें उत्तर लिहिलें नाहीं.

तोंच पुनः एक भय्यासाहेबांचें पत्र तिला आलें. त्यांत पुनः तेंच लिहिलें होतें. पण त्या पत्रावरून भय्यासाहेबांना—असेंच अंधारांत ठेवलें तर वेडहि लागेल अशी भीति वाटून तिनें उत्तर लिहिण्याचें ठरविलें. हें दुसरें पत्र आलें नसतें तरीहि तिनें कदाचित् नंतर उत्तर लिहिलें असतें. कांहीं तरी वाटून तिनें लिहिलें असतें. पण आतां ही आयतीच एक सबब तिला झाली!

"रा. भय्यासाहेब यांस, सा. न. वि. वि. आपण किती जरी वाईट असला तरी तुमच्या मनाची स्थिति विलक्षण झाली आहे म्हणूनच हें पत्र लिहित आहें. कारण कोणाचेंहि मन दुखविणें मला पसंत नाहीं. परंतु आतां मात्र तुम्ही या पत्राचें उत्तर लिहूं नये. लिहिलेंत तरी मी तें फोडूनहि पहाणार नाहीं व उत्तराची तर पुन्हां मुळींच अपेक्षा करूं नका. मी स्पष्टीकरण तें काय करणार? तुमचें तुम्हांलाच माहीत. तुम्हीच नीट विचार करा म्हणजे तुमचा वाईटपणा तुम्हांला आपोआप कळेल. मी त्याची वाच्यता कशाला करूं? कुरुप मनुष्यानें आरसा पाहिला म्हणजे त्याला आपलें रूप दिसतेंच. त्याचें वर्णन करून सांगणें कोणाला आवडेल? सांगावयाचें तें मी पहिल्या पत्रांत लिहिलेंच आहे. आणखी

जीभ कशाला विटाळवूं? कोळसा उगाळावा तितका काळाच. तुम्हीं कांहीं जरी आतां म्हटलेंत तरी माझा निश्चय ढळणार नाहीं व अशा मुलींना फसवणाऱ्या दुराचारी व दांभिक मनुष्याशीं मी मैत्रीहि ठेवणार नाहीं मग लग्न कुठलें! तुह्मांला जर कन्याशाळेंतील शिक्षण आवडत नाहीं तर माझ्याशीं प्रथम लग्नाला कशाला कबूल झालां? कन्याशाळा तुह्मांला कमी प्रतीची वाटते, आह्मांला वकील बॅरिस्टरीण होतां येणार नाहीं तर जिला वकील बॅरिस्टरीण होतां येईल तिच्याशींच लग्न करा. अशा मुली तुह्मांला शेंकडो मिळतील. त्यांच्याशीं टेंकडीवरील पुलावर बसून चोरून एकमेकांत हंसा आणि आमच्या शाळेच्या नांवानें खडे फोडा आणि आमची थट्टा करा. त्यांनाहि तुम्ही शेवटीं फसवणारच पण मला काय त्याचें! तरी देखील त्या मुलींना मी सावध करीन. तुम्हीं फील्ड् सर्व्हिसवर काय काय प्रकार केलेत ते त्यांना सर्व सांगेन. याउपरहि तिला तुमच्या गळ्यांत मिठी मारायची असेल तर खुशाल मारूं द्या! पण मी शक्य तितका प्रयत्न करीन. 'ही कांहीं कन्याशाळा नाहीं' असें ती म्हणाली आणि तुम्हीं पण तिला दुजोरा दिला. कन्याशाळा कांहीं वाटेवर पडली नाहीं. तिच्याशींच तुम्हीं लग्न करा. तीच तुह्माला योग्य आहे. छेः! पण तुम्हीं कुठें तिला योग्य आहां! ती झाली तरी मानी स्त्रीच आहे. सरकारी शाळेंतील असली तरी आर्या आहे. तिला मी हरप्रयत्नानें तुमच्या कचाट्यांतून सोडवीन. कितीहि केलें तरी मी कन्याशाळेंतली आहे. तिचा मला हेवा वाटला तरी तिला मी तुह्मांला फशीं पाडूं देणार नाहीं. खरें ह्मटलें तर तिनेंहि मला एकप्रकारें तुमच्याबद्दल अगोदर इषारा दिलाच होता पण तो तिनें हेव्यामुळें दिला असेल असें मला त्यावेळीं वाटलें. कारण मी तिच्याशीं विधायक स्पर्धा करते पण ती माझा विरोधी व विनाशक हेवा करते. आणि बरें झालें मी वेळींच जागी झालें. परमेश्वर माझा पाठीराखा आहे. मी चांगली नाहीं माझें शिक्षण कमी दर्जाचें जर तुह्मांला वाटलें तर इतकें प्रेम दाखवून व माझ्याशीं लग्न कशाला ठरवलेंत? मला नादीं लावून फुसलावण्याकरतां. पण मी कांहीं कुक्कुलं बाळ नाहीं. आम्ही फक्त करपोतेऱ्याच्या कामाच्या, उंदरांचीं बिळं लिंपण्यापुरतं आमचं शिक्षण, आमचं कार्यक्षेत्र तिखटामिठापुरतं, आम्हीं गिलीटाच्या लोखंडी सेफ्टी पिन्स. तुम्हीं मला चलनी नाण्याची–गिनीची उपमा दिलीत. तेथें तुम्ही सपशेल चुकलात, आणि चुकलात इतकेंच नव्हे तर त्यांत माझा प्रत्यक्ष अपमान झाला.

असल्या अपमान करणाऱ्या मनुष्याशीं मैत्री ठेवण्याइतक्या शिळपट आम्हीं नाहीं. तरुणींनीं लाथ मारल्यावर फुलणारें अशोकाचें झाड संस्कृत कवींनीं वर्णिलें आहे. पण माझ्या मतें तें अशोकाबद्दलच नसून साऱ्या पुरुषजातीबद्दल खरें आहे. याचें प्रत्यंतर मला अनेक वेळां आलें आहे. तुमच्या बाबतींतहि आलें आहे. व इतर मुलींनाहि याची सत्यता पटेल. माझ्यासारख्या 'पास झालेल्या मोलकरणीशीं' लग्न करून तुह्माला काय मिळणार? तुमच्या आयुष्याचें मातेरें होईल. तुह्मांला एखादी 'पास झालेली परिचारिका आणि सुईणच' योग्य! किंवा एखाद्या सरकारी मॅट्रिक मुलीशीं लग्न करा. व तिला समाजशास्त्रांत एम्. ए. करा. नाहींतर तुमच्यासारखीच डॉक्टरीण करा. तशीच मुलगी तुह्मांला आवडेल. बाजारांत चालणारी, सरकारी शिक्क्यामोर्तबाची गिनीच तुम्ही खरेदी करा. ती कुठेंहि चालेल—खपेल. तुह्मांला प्रेमा-बिमाचा प्रश्नच नाहीं. कारण प्रेमाची कांहीं चलनी नाण्यासारखी बाजारांत देवघेव होत नसते. इतकें असून तुम्हीं माझ्याशीं प्रेम करतोसें दाखविलेंत व लग्नालाहि कबूल झालांत. का? तर तुम्ही माझ्या रूपाला भुललांत. माझें शिक्षण आवडलें नाहीं तरी माझ्या रूपानें तुह्माला मोहिनी घातली. त्यांत मी आत्मप्रौढी करीत नाहीं. कारण तो कांहीं माझा गुण नाहीं. ईश्वरानें मला रूप दिलें आहे त्यांत मला आत्मस्तुती करावयाची नाहीं. पण एक खरी गोष्ट सांगितली. मला रूप नसतें तर बरें असेंच वाटण्याचा मला पुष्कळदां प्रसंग आला आहे.

नाटकांतील व्हिलन वरून चांगला सभ्य व सात्त्विक वृत्तीचाच वाटतो पण आंत जहर विष भरलेलें असतें. पण व्हिलनला पुरून उरणारी ही कन्याशाळेंतील उषा आहे. नाटकाच्या शेवटीं व्हिलनचा नाश होतो व हिरॉईन जिंकते. म्हणूनच मीं म्हटलें कीं हा पांचव्या अंकाचा पहिला प्रवेश उघडला आहे. तमाचा नाश करून सूर्यप्रभेची ध्वजा उभारणारी ही कन्याशाळेंतील उषा आहे हें पक्कें समजा! तसेंच रात्रभर अंधारांत असणाऱ्या मुलींना जागें करून त्यांना उजेडांत मार्ग दाखविणारी ही उषा आहे.

अधिक लिहीत नाहीं. लिहिलें हेंच अधिक. तुम्ही यावर मुळींच उत्तर लिहूं नका. मी फाडून जाळून टाकीन—न वाचतां.

उषा.

सांगणार नव्हतें पण सांगतें. त्या दिवशीं मला खोटें सांगून फसवून तुम्ही अहिल्येबरोबर एकटेच फिरायला गेला."

यानंतर उषा पास झाल्याचे दिवशीं घडलेली हकीगतहि तिनें थोडक्यांत लिहिली. "गांवांतल्या पोरी पास झाल्याचें तुह्मांला कौतुक वाटतें पण मी पास झालें त्या दिवशीं माझ्या दारावरून गेला–त्याच दिवशीं तुम्ही हिरवा नेकटाय घातला होता–पण घरांत आला नाहीं."

* * * *

उषेनें तसेंच केलें. भय्यासाहेबांनीं पुढीलप्रमाणें पत्र लिहिलें होतें पण तें उषेनें न फोडतां फाडून टाकलें. "आपण पत्र लिहिण्याची–मनांत नसतां मेहेरबानी केलीत ह्मणून मी आपला खरोखरच फार फार आभारी आहें. परंतु आपण खरा उलगडा कांहींच केला नाहीं यामुळें चित्ताला शांती मुळींच वाटत नाहीं. उलट अधिक अस्वस्थ झालें आहे. तुम्हांला वाटतो तसा मी नाहीं हें सांगूनच तुह्मांला खरें वाटलें तर. तें मी सिद्ध तरी कसें करूं ? तुम्हीं केलेले आरोप ऐकण्यापेक्षां मी लढाईंतच कां मेलों नाहीं ! कोणाचेंहि मन न दुखवण्याची तुमची भावना पाहून मला तुमच्याबद्दल विशेषच आदर वाटत आहे पण तुमच्या गैरसमजामुळें मला यातना होत आहेत. लग्न मोडल्याचेंहि मला इतकें वाईट वाटत नाहीं पण माझ्याबद्दल एका मुलीचा गैरसमज झालेला मला पाहवत नाहीं. वाटल्यास माझ्याशीं लग्न करूं नका–पण निदान माझ्याबद्दल असा गैरसमज करून घेऊं नये एवढी तरी विनंती मान्य करा. मी अगदीं निष्पाप, निष्कलंक आहे. तुम्ही केलेले घाणेरडे आरोप मला वाचवत देखील नाहींत. भेटायला परवानगी द्याल तर संशयपटल दूर होऊन तुमचें मन मी माझ्याबद्दल स्वच्छ करीन. एवढी भिक्षा घालाच. आतां मैत्रीहि शक्य नाहीं हें ऐकून तर माझें काळीज चर्रर होतें ! तुमच्या इतकें मी आजपर्यंत अन्य कोणत्याहि मुलीवर प्रेम केलें नाहीं कोणाला स्वप्नांतहि फसविलें नाहीं. तुमचे कान कोणीतरी भरले असले पाहिजेत. तसें म्हटलें तर जगांत माझा एकहि वैरी नाहीं हें मी अभिमानानें सांगतों. कन्याशाळेबद्दल लिहिलेंत; ती सगळी थट्टा. उगीच वादविवाद वाढविण्याकरतां गम्मत. कसेंहि असलें तरी तुमची, तुमच्या हुषारीची मला प्रत्यक्ष ओळख आहे व गिनीगोल्डपेक्षां तुमची किंमत अधिक वाटली म्हणूनच मी तुम्ही कन्याशाळेच्या असलां तरी मी लग्नाला उत्सुक झालों. व आतां तर सहवासानें माझें प्रेम अधिकच दृढ झालें असल्यामुळें तुम्ही जरी आहांत

त्याहून कमी सुसंस्कृत असतात किंवा दिसण्यांत चांगल्या नसतां तरी मी तुमच्या चिरंतन सहवासाकरतां वाटेल तो आत्मयज्ञ करीन. तुमचें रूप मला आवडलें ही गोष्ट मी मुळींच लपवून ठेवली नाहीं व ठेवीतहि नाहीं. चार चौघांना जी दिसते ती गोष्ट मी लपवूं तरी कशी ? मला रूप आवडलें ही गोष्ट अगदीं खरी आहे, पण त्यामुळें व तेवढ्याकरतांच तुमच्याशीं मी प्रतारणा केली हें मात्र अगदीं साफ खोटें आहे. तें मला सिद्ध करतां येत नाहीं म्हणून हताश झाल्यासारखें वाटतें. तुमची कशी खात्री करूं ? हृदय उघडून दाखवितां आलें असतें तर दाखविलें असतें. माझ्याशीं लग्न करूं नका–निर्दय व्हायचें असलें तर मैत्रीहि ठेवूं नका, पण हें किल्मिष तुमच्या पवित्र अंतःकरणांतून काढून टाका. अरेरे ! इतक्या निर्मल अंतःकरणांत इतका अमंगल समज रहायला मी कारणीभूत झालों अं ? कन्याशाळेबद्दलची सगळी थट्टा होती. ती तुम्ही खरी मानली, एखाद्या वस्तूवर प्रेम बसावयाला पुष्कळ कारणें असतात. एखादें सुंदर चित्र–मेणाचें असलें तरी–आपण घेतों ना ? सुंदर चित्र आपल्याला हवेसें वाटतें ना ? तांबड्या कण्हेरीचें फूल लांबून आवडतें व त्याला शोभा आहे. गुलाबाच्या फुलाला सुंदर रंग असतो व त्याला वासहि असतो. कण्हेरीचें फूल तोडणारा कांहीं वेडा नसतो. पण कोणीहि गुलाबच पसंत करील. जितके अधिक गुण असतील तितकी वस्तु अधिकच चांगली अर्थात् एखादी मुलगी गुणी असून लावण्यवती असेल तर दुधांत साखरच पडली ह्मणावयाची. सौंदर्य आवडलें तर तो वाईटपणा नसून रसिकपणाच मी समजेन. व एखाद्या मनुष्याच्या स्वरूपांत कांहीं व्यंग असलें व एखाद्या मुलीला तो गौणपणा वाटला तर त्यांत तिची चूक नाहीं. तें साहजिक आहे.

मला तर वाटतें कीं नाटकाचा पांचवा अंक उघडला नसून आतांच कोठें संविधानकाचें पहिलें वळण आलें आहे, बीजारोपण होत आहे. व माझी खात्री आहे कीं या नाटकांत व्हिलन कोणी तिसराच आहे व शेवटीं मी हीरो होणार–मग कदाचित् शोकपर्यवसायी नाटक होणार असेल व हीरो हीरॉइन एकमेकांना कायमचीं अंतरणारहि असतील !

तुमच्याबद्दल अहिल्येनें मला कांहीं गोष्टी सांगितल्या आहेत पण आपल्या प्रत्यक्ष परिचयानंतर त्यांना महत्त्व देण्याचें मला कारण दिसत नाहीं. वेळच आली ह्मणून थोडक्यांत सांगतों. तुह्मांला अचरट ( हा तिचा शब्द आहे )

हें विशेषण तिनें लावलें होतें. व कित्येकदां तुम्ही वेड्यासारखा बावळटपणा करतां असा तिचा आक्षेप होता. एकदां म्हणे तुम्ही कुंकवाऐवजीं एका बाईला वाटलेली मेंदीच लावायला पुढें केली. एकदां एका डोहाळतुलीला तांबडा खण आणि तांबड्या बांगड्याच भरायला निघालां! आणि असेंहि तिनें सांगितलें- त्यांत खात्रीनें चूकभूल असावी, एकदां एका आजीबाईंना त्यांचें चॉकोलेट रंगाचें पातळ देण्याऐवजीं एक फॅशनेबल रंगीत पातळच निऱ्या करून दिलेंत! एकदां स्वतःच तुम्हीं एक पोलकें शिवलेंत. पण अंग एका रंगाचं व बाह्या त्याला भलत्याच रंगाच्या जोडल्यात. असा कांहीं विक्षिप्तपणा करतां. आणखी एकच गोष्ट सांगतों. एकदां तुम्ही शशिकांताच्या डोळ्यांत घालण्याकरतां कॅर्बा·लिक आसिडचीच बाटली आणलीत!

ह्या गोष्टी खऱ्या असल्या तरी प्रत्यक्ष तुमची ओळख झाल्यापासून मला तर तुमच्या वागणुकीत यत्किंचितहि 'अचरट'पणा किंवा विक्षिप्तपणा दिसला नाहीं.

त्या दिवशीं मला काम आहे म्हणून तुम्हांला थाप देऊन मी अहिल्येबरोबर फिरायला गेलों व तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलें म्हणतां! इलाज नाहीं. मी आजपर्यंत अहिल्येबरोबर केव्हांच एकटा गेलों नाहीं. तुमची कांहीं नजरचूक, दृष्टिभूल झाली असली पाहिजे खास! कदाचित् तुमच्या शॉर्टसाईटनें तुम्हांला फसविलें असेल.

तुम्ही पास झाल्याचे दिवशीं मी तुमच्याकडेच निघालों होतों पण वाटेंत ले. कुमार मला भेटला. तो माझें घर हुडकीत येत होता. मी जरी त्याची पर्वा करीत नाहीं - कारण तो नीच मनुष्य आहे—तरी आम्ही फील्ड सर्व्हिसवर खांद्याला खांदा भिडवून काम केलें आहे. चाल करतांना सँडविच विभागून खाल्लें आहे. त्यानें अत्यंत आग्रह केल्यावरून त्याजबरोबर गेलों. मला औप-चारिक आनंद प्रदर्शित करावयाचा असता तर मला अभिनंदनपर चिठ्ठी पाठवतां आली असती.

कॅन्व्हसचे दोन तुकडे जोडायला त्यांचा एकजीव व्हायला सुतळी लागते. पण दाभणाखेरीज सुतळी त्यांना बांधूं शकत नाहीं. दाभण नसलें तर कंपासच्या टोकानें भोंक पाडतां येतें. मात्र नंतर सुतळीच भक्कम नसेल तर ते तुकडे जुळले जाणार नाहींत. दोन जीवांचें ऐक्य व्हायला प्रेमाचें अखंड भक्कम बंधन लागतें, मग तें कोणत्या का मध्यस्थीच्या मदतीनें जमेना—रूप, गुण इत्यादि.'

पण उषेनें हें सारें भारूड वाचलेंच नाहीं. मात्र पत्र केव्हां येतें कारण येईल हा अदमास तिनें बांधला होता—याची ती एकप्रकारच्या उत्कंठेनें वाट पहात होती. पत्र केव्हां येतें व आपण तें न वाचतां फाडून केव्हां टाकतों असें तिला झालें होतें. तिच्या अपेक्षेप्रमाणें पत्र तर आलें. प्रथम त्या लिफाफ्याची जाडी पाहून तिला आपल्याच शब्दाची आठवण झाली " मानी मुली असल्या हलक्या मनुष्यांशीं कसलाच संबंध ठेवीत नाहींत व त्यांची चारगट प्रेमाची फाजील पत्रें तर मुळींच वाचीतहि नाहींत. 'कुरुप मनुष्यानें आरसा धरला म्हणजे पुरे' हें एक वाक्य—पत्र पोस्टांत टाकल्यापासून—लिहिलें नसतें तर बरें झालें असतें, असें तिला राहून राहून वाटूं लागलें होतें. कारण तिच्या मनांत नसतां त्या वाक्याचा भलताच अर्थ होत होता—भय्यासाहेबांच्या काळेपणाला व रूपाला लागून—बोचून लिहिल्यासारखें तें बाह्यात्कारी दिसत होतें. आपल्या स्वतःच्या सौंदर्याचा जरी तिला गर्व नव्हता तरी ती तें जाणून होती व साहजिकपणापेक्षां शहाणपणामुळें ती त्याबद्दल अगदीं निरभिमान दाखवण्यास शिकली होती. तेव्हां त्या वाक्याचा त्यांनीं काय अर्थ केला असेल तें पाह·ण्याची तिला जिज्ञासा झाली. पण तिलाच वाटलें कीं पूर्वोत्तर संबंधावरून त्या वाक्याचा वाईट अर्थ जाणूनबुजून केला तरी होणें शक्य नाहीं. शेवटीं विठ्ठल-नचें वरवर असणारें सभ्य वर्तन असेंच असतें याची आठवण होऊन अशानें वाढतच जाईल म्हणून तिनें—किंचित् दुःखानें—एकदम तें पत्र फाडलें व त्याच्या चिंध्या चिंध्या करून तें तिनें केराच्या टोपलींत टाकलें. पण न जाणो कोणी पाहील—त्या चिंध्या जुळवून अर्थ लावील अशी शंका येऊन म्हणा किंवा भय्या-साहेबांच्या पूर्वीच्या प्रेमाची आठवण होऊन व ज्यावर एका काळीं आपण प्रेम केलें त्याचें हस्ताक्षर केराच्या टोपलींत पडूं देणें तिला अप्रशस्त वाटलें म्हणून म्हणा, तिनें त्या एकूणएक चिठोऱ्या गोळा केल्या व चुलींत नेऊन जाळून टाकल्या! तेव्हां तिचें मन शांत झालें.

क्षणभर शांत झालें. प्रथम त्या चिठोऱ्यांतून धूर निघूं लागला व भुकदिशीं त्याचा जाळ झाला व तें लांब पत्र जळून खाक झालें. इतक्यांत तिला कांहीं कल्पना आली—पत्र जाळल्याबद्दल पश्चात्ताप वाटूं लागला, व त्यांतील एखादी चिठोरी सोडवावी असें तिला वाटलें. पण आतां गोष्ट हातची गेली होती. एक चिठोरी सबंध राहिली होती—काळी ठिक्कर झालेली व त्याच्यावर अक्षरें त्याहून

काळी पण जशीच्या तशी दिसताहेतसें वाटत होतें. ती चिठोरी तरी–सहज–बघावी असा तिला अनिवार मोह झाला. तिलाहि स्वतंत्रपणें क्षणभर वाटलें कीं कदाचित् भय्यासाहेब हे व्हिलन नसून हीरोच असतील. व हा नाटकाचा शेवट नसून आरंभ असेल. तिनें तें चिठोरें अलगद उचलण्याचा प्रयत्न केला पण उचलतांनाच त्याचा भुगा भुगा झाला !

त्या चिठोऱ्यांत भय्यासाहेबांनीं आपलें हृद्गत ओतलें असेल, कदाचित् त्यांचें म्हणणें–जें म्हटलें असेल तें–खरेंहि नसेल कशावरून ? निदान आपण ऐकून तरी घ्यावयास पाहिजे होतें. त्या चिठोरीचा भुगा करणें म्हणजे भय्यासाहेबांच्या अंतःकरणाचा–हृदयाचा चोळामोळा केल्यासारखें झालें. त्यांच्या अगोदरच दुःखित हृदयाला दग्ध करण्याप्रमाणें झालें. अरेरे असा निर्दयपणा आजपर्यंत कोणत्याहि तरुणीनें केला नसेल.

काय असेल तें असो. तें पत्र फाडून जाळून टाकल्यापासून तिला चैन पडेनासें झाले. त्यांना तसें उत्तर लिहून त्यांची क्षमा मागावी का ? तिनें दुसऱ्या पत्रांत काय काय लिहिलें होतें तें ती आठवूं लागली–कारण त्याची नक्कल तिजजवळ नव्हती. त्यांतले कोणते शब्द तुसडेपणाचे होते. कोणते झोंबणारें होते ? एखादा शब्द तरी त्यांचें दुःख हलकें करण्यासारखा होता कीं नाहीं ?

भय्यासाहेबांनीं पत्रोत्तराची वाट पाहिली पण उत्तर आलें नाहीं. शेवटचें म्हणून एक त्यांनीं पुन्हां पत्र पाठविलें पण त्याचेंहि उत्तर आलें नाहीं. आकाश फाटल्याप्रमाणें त्यांना झालें. जाग्रणामुळें ते जेव्हां उशीरां उठत तेव्हां सूर्याचा प्रकाश खोलींत आलेला पाहून त्याचें मन प्रफुल्लित होई–इतक्यांत त्यांना आपल्या शोकमय कहाणीची आठवण होऊन अत्यंत वाईट वाटे व त्या सूर्यप्रकाशांत त्यांना चोहोंकडे अंधार दिसे. अगर आपल्या खोलींतील निरनिराळया जिन्नसा दिसण्याऐवजीं त्यांनीं उषेबरोबर घालविलेल्या काळांतील निरनिराळे देखावे दिसत. ते आपल्या रोग्यांची छाती तपासत तेव्हां फुप्फुसांत भलतेच आवाज ऐकूं येतात कीं काय हें पहाण्याऐवजीं उषेचा गोड आवाज ऐकूं येण्याचीच जणों ते वाट पहात. ते जेव्हां डोळे तपासत तेव्हां त्यांत उषेची बाहुली त्यांना दिसे. सूक्ष्मदर्शकयंत्रांत मलेरियाचे जंतू पहाण्याऐवजीं त्याहिपेक्षां सूक्ष्म असें उषेचें मन कोठें दिसतें कां असें त्यांना वाटे. रक्ताच्या पांढऱ्या

चकत्यांतील गुंतागुंतीचे कण पाहून तरुणींच्या अगम्य मनाची कल्पना होई. सूक्ष्मदर्शक यंत्र किती तुच्छ असें त्यांना वाटलें.

* * *

असें किती दिवस चालणार? आपला आवडता विषय जो नेत्रशास्त्र त्याचा अभ्यास अधिक नेटानें करण्याचें त्यांनीं ठरविलें. व त्यांना एकप्रकारें संधीहि आली. त्यांची बदली रावळपिंडीला झाली.

एके दिवशीं सकाळीं त्यांच्याकडे सैन्यांतील एक हवालदार आपल्या कमांडिंग ऑफिसरकडून एक चिठ्ठी घेऊन तपासून घेण्याकरतां आला. सिग्नलिंगच्या कामाला योग्य असल्याचें सर्टिफिकेट त्याला द्यावयाचें होतें. कॅप्टनसाहेबांनीं काळजीपूर्वक त्याचे डोळे तपासले. कोठें कांहीं व्यंग नव्हतें. आतां एकच पण महत्त्वाची कसोटी लावावयाची राहिली होती. त्या उमेदवाराचें वर्णज्ञान पहावयाचें शिल्लक होतें. म्हणजे त्याला निरनिराळे रंग व रंगछटा कितपत बरोबर ओळखूं शकतात त्याची परीक्षा कर्तव्य होती. याकरतां त्यांनीं एका पुस्तकांत डकवलेल्या निरनिराळया रंगाच्या रंगछटांच्या लोकरी त्या उमेदवारापुढें धरल्या व पांढरी लोकर त्याला दाखविली. ती त्यानें ओळखली. नंतर काळी लोकर ओळखली. मग तांबडी लोकर दाखविली तीहि त्यानें ओळखली. हिरव्या, जांभळया, पिवळया त्यानें ओळखल्या. पण जेव्हां गुलाबी लोकर दाखविली तेव्हां ती 'फिकट हिरवी' असें त्यानें सांगितलें व फिकट हिरवी 'हिरवट' म्हणून ओळखली. हे शेवटचे प्रयोग त्यांनीं पुन्हां पुन्हां केले पण फिकट तांबड्या रंगाला तो उमेदवार 'हिरवट' असेंच प्रत्येक वेळीं सांगू लागला. गुलाबी व फिकट हिरव्या लोकरी एकदम दाखविल्या तर त्या त्याला ओळखतां येत पण एकएकट्या दाखविल्या तर मात्र त्यांना तो सरसकट हिरवटांत मोडी. कॅप्टनसाहेबांना एक प्रकारचें कुतूहल वाटलें व 'केस इंटरेस्टिंग' असल्याचें त्यांनीं बोलून दाखविलें. अशी केस—वर्णांधत्वाची त्यांनीं ही दुर्मीच आज पाहिली. व त्यांना अतिशय आनंद झाला. त्यांनीं त्या उमेदवाराला पुन्हां नीट तपासलें, व टिपणें करून घेतलीं. त्याचें नांव राजाराम बाळकृष्ण. तो एका मराठा पलटणींत शिपाई म्हणून भरती झाला होता व त्याला लिहितां वाचतां येत असल्यामुळें ॲड्जुटंटच्या कचेरींत त्याला शिपाई-कारकून नेमण्यांत आलें होतें. सिग्नलच्या तुकडींत त्याला शिक्षण देण्याचें

ठरविण्यांत आल्यामुळें त्याला 'डाक्तरी'करतां पाठविला होता. त्याची थोडी-विचारांत न घेण्याइतकी शॉर्टसाईट होती.

त्याच्या आईबापाबद्दल बहीण-भावंडाबद्दल कॅप्टनसाहेबांनीं माहिती विचारली, परंतु त्यांत तो काचकुच करूं लागला व असंबद्ध गोष्टी सांगूं लागला. कॅप्टनसाहेबांनीं त्याला खोदखोदून विचारलें तसा तो अधिकच कचरूं लागला व एकदां एक सांगे तर एकदां एक सांगे. आजपर्यंत त्याच्या नात्यागोत्याच्या माणसांची इतकी छाननी कोणींच केली नव्हती. तो कांहींतरी लपवीत होता हें उघड होतें तेव्हां ममताळुपणानें पण किंचित् अधिकारवाणीनें व थोडेसें दरडावून त्यांनीं विचारलें. त्यालाहि वाटलें कीं आपण खरी गोष्ट सांगितली नाहीं तर कदाचित् आपल्या डोळ्यांत जें कांहीं बिघडलें असेल त्यावर योग्य औषध मिळणार नाहीं व सर्टिफिकीटहि डॉक्टर देणार नाहींत.

हलक्या आवाजांत तो म्हणाला, "डॉक्टरसाहेब, माफ करा. मी एक गोष्ट लपवून ठेवली होती. पण ती मी फक्त तुम्हांलाच सांगेन."

इतर हाताखालच्या लोकांस बाहेर जाण्याचा इषारा देऊन कॅप्टन म्हणाले, "आतां अगदीं मन मोकळं करून सांगा."

उमेदवार म्हणाला. "माझं खरं नांव अच्युत सदाशिव साठे. मी कांहीं कारणावरून घरून पळून गेलों व सैन्यांत दाखल झालों. माझे वडील माझ्या लहानपणीं वारले-कशानें ते मला ठाऊक नाहीं. माझ्या आठवणींतली माझ्या नात्याची मंडळी म्हणजे माझी आई पण तिचे डोळे चांगले होते. माझ्या मावशीच्या डोळ्यांनाहि कांहीं होत असलेलें मला आठवत नाहीं. माझी मावसबहीण-तिला शॉर्ट साईट आहे. तिचं नांव कृष्णा रानडे. सध्यां ती कोठें आहे मला कांहींच माहीत नाहीं. तिचें लग्न एव्हांना झालें असेल."

शंभरांत तीन पुरुषांना व तीन बायकांना वर्णांधत्व असतें असें लिहिलें आहे पण वर्णांध असलेला मनुष्य क्वचितच लक्षांत येतो. कारण पूर्वानुभवावरून व त्या वस्तूच्या अंगावरील रेषा, वीण यावरून रंग बरोबर समजले नाहींत तरी-तो ही उणीव भरून काढतो व सहसा ही गोष्ट कोणाच्या लक्षांत येत नाहीं. अर्धवट वर्णांधत्व हें मुद्दाम त्याकरतां तपासल्याशिवाय यामुळें उघडकीस येणें अवघडच. आतां वर्णांधत्व पूर्ण असतें-म्हणजे कोणतेच रंग ओळखतां येत नाहींत-तांबड्या, हिरव्या पिवळया, निळया सर्व वस्तू त्याला राखी अगर गाढवी

रंगाच्या पण निरनिराळ्या तऱ्हांच्या दिसतात. किंवा वर्णांधत्व अर्धवट असतें. तें बहुधा तांबड्या-हिरव्या रंगाबद्दलच असतें किंवा निळें-पिवळें अगर पांढरें-काळें याबद्दल असेल. म्हणजे इतर रंग त्याला ओळखतात पण तांबडा रंग त्याला ओळखत नाहीं-तांबड्या रंगाला तो हिरवा समजतो व गुलाबी रंग त्याला फिकट हिरवा वाटतो. दोन्ही रंग एकदम दाखविले तर अनुमानावरून व तेजावरून तो त्यांत फरक करील पण एकच रंग दाखविला तर तो तांबड्याला हिरवा व तांबड्या रंगाच्या छटांना हिरवट म्हणेल. हें वर्णांधत्व आनुवंशिक असतें-आईकडून आलेलें, त्यांत आई त्यांतून सुटलेली असेल. किंवा हें वर्णांधत्व कांहीं कारणानें मागाहून झालेलें असेल. उदा० डोळ्यांतील पडद्याचे कांहीं रोग, दृष्टितंतूंचे रोग वगैरे.

कॅप्टनसाहेबांनीं घरीं गेल्यावर आपलें पूर्वीचें टिपण काढलें. त्यांत एकच केस त्यांनीं नमूद करून ठेवली होती. ह्या दोन्ही केसिस प्रसिद्ध कराव्या असें त्यांनीं मनांत ठरवलें.

तिचें नांव कृष्णा रानडे. वय वर्षे ७. वंशेतिहास-विशेष कांहीं नाहीं. मावशीला खुपऱ्या. मावसभाऊ अच्युत सदाशिव साठे वय वर्षे ९. वगैरे.

ह्या दोन्ही केसिस जुळलेल्या पाहून त्यांना एकप्रकारच्या धंदेवाईक गुदगुल्या झाल्या. वाचकांना यापूर्वीच शंका येऊन गेली असेल पण कॅप्टनसाहेबांना मात्र अद्याप मुळींच कल्पना आली नव्हती. कारण त्या केसिसमध्यें धंदेवाईक दृष्टीनें व शोधक बुद्धीनें ते इतके गुरफटून गेले होते कीं रानडे या नांवाचें त्यांना विशेष कांहीं वाटलें नाहीं. कदाचित् ते फार लांब रावळपिंडीला होते म्हणून इतरांना सहज दिसणारी गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नसेल. परंतु ते जेव्हां हस्तलिखित लिहूं लागले तेव्हां त्यांना कृष्णा रानडे व अच्युत साठे ह्या शब्दावरून कांहीं तरी आठवण झाल्यासारखें वाटलें पण कुठें व कशी कांहींच समजेना.

कृष्णा रानडे. नव्हे, ती तर उषा रानडे. आणि अच्युत? अच्युत हें नांव लक्षांत राहाण्यासारखें होतें. उषेचा मावसभाऊ पळून गेला होता. पण त्याचें आडनांव काय? रिपोर्टाखालील माणसें मावस भाऊबहिणी होतीं हें निश्चितच व रिपोर्टाकरितां त्यांचा आणि उषा रानडे व अच्युत यांचा मेळ घालणें जरूर नव्हतें. निराळ्याच एका कारणाकरतां मात्र या गोष्टीचा छडा लावावा असें

त्यांच्या मनानें घेतलें. उषेचें नांव उषाच कीं पाळण्यांतलें आणखी एखादें नांव आहे- –कृष्णाबाई ?

तर अच्युत साठे उषेचा मावसभाऊ असला व उषा जर कृष्णा असली तर एक कोडें सुटेलसें त्यांना वाटलें. कृष्णा रानडेला ( म्हणजेच उषेंत ) वर्णांधत्व होतें. पण अद्याप कोणाच्या लक्षांत आलें नव्हतें. तांबड्या कुंकवाऐवजीं हिरवी मेंदी तिनें पुढें केली होती. हिरव्या बांगड्यांऐवजीं तांबड्या बांगड्या भरल्या होत्या. आजीबाईंना तांबडें पातळ द्यावयाचें पण वर्णांधळेपणामुळें एक हिरवें फॅशनेबल पातळ तांबडें समजून तिनें दिलें–होय. कॅर्बॉलिक ॲसिडच्या बाट-लीला तांबडी चिठ्ठी असेल व डोळयांत घालण्याच्या औषधाच्या कुपीवर हिरवें लेबल असावें. अर्थात् तांबडी चिठ्ठी ती हिरवी वाटून तिनें कॅर्बोलिक ॲसिड डोळयांत घालण्याकरतां आणलें.

आतां एक एक धागा ते जुळवूं लागले. कांहीं ओढून ताणून बादरायण संबंधहि जोडूं लागले. खरेंच त्या दिवशीं मी माझ्या मामींना पोहोंचवायला गेलों होतों–त्यांचें चॉकोलेट रंगाचें पातळ होतें. तें तिला हिरवें वाटलें असलें पाहिजे. व म्हणूनच मी अहिल्येबरोबर–फसवून एकटा गेलों अशी तिला शंका आली–ती बरोबरच आहे.

मी एक दिवस तांबडा टाय घातला होता–ले. कुमारनें हिरवा लोकरी सूट व हिरवा टाय घातला होता. वर्णांधळेपणामुळें माझा तांबडा टाय हिरवा वाटून तिचा भयंकर गैरसमज झाला असला पाहिजे.

पण कृष्णा तीच उषा काय ? इतक्या लांबून या गोष्टीचा कसा छडा लावावा ? पत्रांत लिहिणें गैरच. मग अजूनहि आशा आहे काय ? लग्नाची नव्हे पण गैरसमज दूर होण्याची ? कदाचित् आपण आपल्या मुलखाला जाईपर्यंत तिचें लग्न झालेलें असेल. तेंच बरें. म्हणजे मग खुल्या दिलानें व उघडपणेंहि चौकशी करण्यास हरकत नाहीं. किंबहुना तिचें लग्न लवकर होईल तरच बरें ? लग्न होण्याचीच आतां वाट पहावी ? हाय !

नाटकाचा पांचवा अंक उघडला आहे कीं पहिल्याच अंकाला आरंभ झाला आहे ? मी हीरो होणार कीं व्हिलनच राहणार–तिच्या दृष्टीनें ? कीं हीरो होऊनसुद्धां हें शोकपर्यवसायी नाटक होणार ?

पण हें सारें तिला कळेल तर ना? आपला वर्णांधळेपणा तिला समजला तर? आणि तें देखील कृष्णा आणि उषा एकच असल्यास! तिचें कोणाशीं तरी लग्न लागेपर्यंत वाट पहाणें माझ्या नशिबीं आहे काय?

कांहीं विलक्षण-नाटकी-विधिघटनेनें माझा हा वर्णांधत्वावरील लेख तिच्या पाहण्यांत आला तर तिची तीच समजेल. पण मी असंभाव्य गोष्टीचीच अपेक्षा करीत आहे. तिचें कार्यक्षेत्र निराळें माझें निराळें. आधीं माझा लेख आणि तोहि अशा विषयांवर कोण पहाणार?

किंवा याहिपेक्षां एखाद्या सोप्या अगर कल्पनातीत रीतीनें आमची भेटहि होणार असेल? अरेरे! किंवा माझें दुःख मला जन्मभर मजपाशीच ठेवावें लागेल!



# अज्ञातकारांतील छबू



डॉक्टर जोशी आपल्या दवाखान्यांतील फिरत्या खुर्चीवर एक हस्तपत्रक हातांत घेऊन विमनस्क चित्तानें बसले होते. एखाद्या रोगाची सांथ आली कीं त्यांचा धंदा उत्तम चाले, पण ती सांथ ओसरली कीं पुनः थंड पडे. अशी सांथीबरोबर हेलकावे खाणारी त्यांची मिळकत होती. पण पहिल्या सांथींत मिळविलेले पैसे ते कसेबसे पुनः उसळणाऱ्या सांथीपर्यंत पुरवीत. घरीं त्यांना कोणींच नसल्यामुळें त्यांचें एकट्याचें कसेबसे भागत असे. हल्लीं मात्र ते बरेच अडचणले होते. सांथ असली कीं, त्यांना नेकटाय घातलेला काढावयाला अगर काढलेला असल्यास घालावयाला फुरसत मिळत नसे, व सांथ नसली तरी ते तितकेच अन्य कार्यांत व्यग्र असत. त्यांचा अत्यंत आवडीचा विषय म्हणजे सांसर्गिक रोग. त्यावर अशा रिकाम्या वेळीं ते लेख लिहीत, किंवा व्याख्यानहि करवीत. आज त्यांच्या हातांत जें हस्तपत्रक होतें तें त्यांनींच पूर्वी एका 'शिशुसंगोपन व आरोग्य सप्ताहा'करतां स्वतः जुळविलेलें होतें. पण त्यामध्यें एक महत्त्वाचा मुद्दा द्यावा तितका प्राधान्यानें न दिला गेल्यामुळें त्यांत कशी सुधारणा करावी याचा विचार ते करीत होते. त्यांचें मन व्यथित असण्याचें कारण अर्थात् त्यांची सध्यांची सांपत्तिक स्थिति. गेले चारसहा महिने अगदीं रिकामे गेले असल्यामुळें बरींच बिलें थकलीं होतीं व खर्चाची तोंडमिळवणी कशी करावी या विवंचनेंत ते होते. पण ते आशावादी असल्यामुळें वाईट विचारांचें चर्वण करावयाचेंच नाहीं असा निश्चय करून ते आपल्या हस्तपत्रकांत सुधारणा करीत बसले होते.

विषय 'इन्फ्लुएंझा' हा होता. या रोगाचें भयंकर स्वरूप, त्यामुळें होणारी असंख्य प्राणहानि, त्याचा शीघ्र प्रसार, मनुष्याच्या शरीरांत जंतु शिरून तो प्रत्यक्ष आजारी पडेपर्यंतच्या मधल्या वेळांतहि त्याच्या नाकातोंडांतून जंतूंचें बहिःपतन इत्यादि गोष्टीमुळें हा रोग मूळांत उपटून टाकणें कसें आवश्यक आहे, त्या रोगाचा उगम शोधून त्याचे मार्ग रोखण्याचें काम किती कष्टून केलें

पाहिजे हें लक्षांत घेणें, ह्या रोगाचा नुसता कोठें संशय येतांच ती बातमी योग्य अधिकाऱ्यांना देणें हे प्रत्येक व्यक्तीचें प्रधान व पवित्र कर्तव्य आहे, हा मुद्दा विशेष गौरवानें त्या हस्तपत्रकांत लिहावयास पाहिजे होता. असो.

आलटून पालटून आरोग्यसप्ताह व घरभाड्याचें बिल याचे विचार डोक्यांत घोळत असतां घड्याळांत नवांचे ठोके पडले. लगेच डॉक्टर उठले. रेनकोट खांद्यावर टाकून टोपी उचलीत "चल-कर बंद" असें गड्याला उद्देशून ते म्हणाले व एक उसासा टाकून पायरीपर्यंत गेले.

तोंच एक मनुष्य घाबऱ्या घाबऱ्या त्वरेनें पायरी चढूं लागला. डॉक्टरांना त्यानें टक्करच दिली! "चला-डॉक्टरसाहेब, चला लवकर. असाल तस्से चला-" तो भरभर म्हणाला.

डॉक्टर मागें वळले व खुर्चीवर जाऊन बसले. "कुठें? कोण आहे आजारी? काय होतं आहे?" प्रिस्क्रिपशनचें पॅड पुढें ओढीत ते म्हणाले.

"साहेब, आतां असले प्रश्न विचारण्यांत कृपा करून वेळ घालवूं नका. नाहींतर माझ्या बहिणीचं काय होईल काय नाहीं कोण जाणे!"

"हो. पण मला नांव-गांव तर उतरून घेऊं द्याल कीं नाहीं? केस तरी नको करायला? नाहीं तर मग स्टॅटिस्टिक्स कसं काढायचं? सांगा, नांव काय, वय किती—"

"डॉक्टरसाहेब, तें सगळं मागाहून सांगेन. आधीं चला."

"अहो, पण काय होतं आहे तें तरी सांगाल? तशीं मला हत्यारं नको घ्यायला?"

"माझ्या बहिणीला ताप भरला आहे-सडकून ताप भरला आहे. बरळते आहे सारखी—"

"केव्हांपासून?"

"कालच पहिल्यानं आला. पडशाचा असेल असं वाटलं, पण चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं, चला लवकर. मोटर तयार आहे."

मोटरचें नांव ऐकण्याबरोबर डॉक्टरांनीं आपला हट्ट आवरता घेतला व "थांब, मी जाऊन येतों" असें गड्याला सांगून व आपली बॅग् घेऊन ते निघाले.

बाहेर अंधार होता. दोघेहि मोटरमध्यें बसले. मोटर वळली, पुन्हां वळली-पुन्हा वळली! बाहेरचें दिसत नव्हतें. मोटरचे पडदे बंद केलेले होते.

दहा मिनिटें वळणें घेत मोटर गेली. दोघेहि उतरले. समोर एक अरुंद गल्ली होती. त्यांतहि अंधार होता. गल्लींतून थोडे अडखळत चालल्यावर एक त्याहून अरुंद बोळ लागला. व एका चाळीच्या पाठीमागील भागीं ते आले. एक जिना चढून ते वर गेले व एका खोलीच्या दारापाशीं आले. त्या इसमानें दारावर 'ठक्—ठक्ठक्' अशा टिचक्या वाजविल्या. त्याबरोबर आंतून 'कोण आहे?' असा आवाज आला. 'दार उघड–डॉक्टर आले' असें हलक्या स्वरांत त्या इसमानें उत्तर दिलें. दार उघडणारी व्यक्ति एक पोक्तशी बाई होती. ती त्या इसमाची आई असावी. त्या खोलींत एक मिणमिण करणारा राकेलचा दिवा जळत होता, व धुराचे लोट चालले होते. डॉक्टर इतका वेळ अंधारांतच असल्यामुळें या अंधुक प्रकाशांतहि त्यांना तेथील सर्व गरीबीचा संसार चक्क दिसत होता. शिवाय त्या संसारांत दिसावयाला वस्तुच नव्हत्या!

आधींच गलिच्छ वस्तींत ही चाळ होती हें अंधारांतहि उघड दिसत होतें. चाळ पडकी झाली होती हेंहि ओळखणें अवघड नव्हतें. खोलींतील भिंतीला चुना तर नव्हताच, पण त्याचा गिलावाहि ठिकठिकाणीं पडलेला होता. पटईत फटी पडल्या होत्या व समोरच्या कोंपऱ्यांत नहाणी होती तेथें वरून पाणी गळत असल्याचे डाग भिंतीवर व पटईवर दिसत होते. भिंतीला लागून एक खाट असून त्यावर कोणीतरी निजलें असावें असें तेथील मनुष्याकृति फुगीर ब्लँकेटावरून दिसत होतें.

त्या इसमानें त्या निजलेल्या व्यक्तीच्या तोंडावरचें पांघरूण काढलें, व "छबू छबू" अशा हलक्या आवाजांत हांका मारल्या.

छबूनें डोळे उघडण्याचा प्रयत्न केला व तिचे ओठहि हलल्याचा भास झाला. डॉक्टरनीं तिला तपासलें व सर्व हकीगत विचारून घेतली. नंतर पिचकारीनें औषध टोंचलें.

छबू तेरा–चवदा वर्षांची दिसत होती. दोन दिवसांच्या तापानें तिला भयंकर ग्लानि आली होती व तोंड फिकें–किंचित् निळसर झालें होतें. तिच्या गोऱ्या तोंडामुळें तो रंग अधिकच उठून दिसत होता.

मोटरनेच परत दवाखान्यांत येतांच डॉक्टरनीं पुन्हा प्रिस्क्रिप्शन्चें पुडकें जवळ ओढून त्यावर रोग्याचें नांव लिहिलें. "पत्ता?" त्यांनीं विचारलें.

इसम कांहींच बोलला नाहीं.

" पत्ता काय ? " डॉक्टरनीं पुन्हां विचारलें.

कांहीं शब्द त्या इसमाच्या तोंडून अर्धवट बाहेर पडले. पण मध्येंच तो थांबला. नंतर कांहीं विचार येऊन एकदम गहिंवरून अत्यंत नम्रतेनें व केविलवाण्या स्वरांत तो म्हणाला, " डॉक्टरसाहेब, कृपा करून मला एवढें विचारूं नका. येवढी भिक्षा घालाच. आमचा पत्ता कोणाला कळूं नये अशी आमची इच्छा आहे. म्हणून अशा घाणेरड्या वस्तींत येऊन राहणें आम्हांला भाग पडलें आहे. सध्या आम्ही अशा संकटांत सांपडलों आहों व आमचें जिणें असें लाजिरवाणें झालें आहे कीं, आपण कोण, कोठले, कोठें आहोंत हें कुण्णा-कुण्णाला कळणें इष्ट नाहीं. डॉक्टरसाहेब, आम्ही कांहीं खुनी, दरोडेखोर नाहीं. पण कांहीं कारणाकरतां थोडे दिवस तरी आम्हांला अज्ञातवासांत कंठणें प्राप्त आहे. तुमच्याकडे मी आलों नसतों–पण माझ्या आवडत्या बहिणीसाठीं–तिच्या जिवाकरतांच मीं हें धाडस केलें. माझ्या आईकडे पाहा आणि आमचा पत्ता मात्र सांगायला लावूं नका. आमच्याबद्दल तुम्हांला भलताच संशय येत असल्यास असाच्या असा मला पोलीसांत नेऊन गुदरवा. पण तुमच्या पाया शपथ—" असें म्हणत खरोखरच त्यानें डॉक्टरांच्या बुटाला हात लावला.

चिखलानें लडबडलेला तो पाय डॉक्टरनीं आखडता घेतला. ते अंमळ विचारांतच पडले. आढ्याकडे दृष्टि टाकून टांकाचें मागचें तोंड त्यांनीं दांतावर लावलें. त्यांना ती भिकार खोली आठवली. ती तेराचौदा वर्षांची सुस्वरूप पण खंगलेली मुलगी त्यांना आठवली. स्वतःची गरीबी आठवली. त्यांनीं खालीं पाहिलें तों दहा–दहाच्या दोन नोटा त्यांना टेबलावर दिसल्या.

" ही आपली व्हिजिट्ची फी आणि ही—ही—"

" असेल कांहीं तरी–असे पुष्कळ असतात–चांगलेहि असतात, वाईटहि असतात. आपल्याला काय ? तरी आलीच मला शंका. कारण ' मोटर उभी आहे ' या शब्दांवरून मला वाटलें एखाद्या बंगल्यांत आपण जाणार !" असा मनांत विचार करून त्यांनीं प्रिस्क्रिप्शन खरडलें व बॉय्‌जवळ तयार करावयास दिलें. अजमासानें एक काल्पनिक ठोकळ पत्ता त्यावर घुसडण्यास ते विसरले नाहींत. नंतर त्या इसमास आजाऱ्याच्या शुश्रूषेबद्दल कांहीं सूचना देऊन ते निघून गेले. बाहेर आल्यावर मोटरचा नंबर पहावा अशी त्यांच्या मनांत कल्पना आली पण तेथें मोटर नव्हती !

पुन्हा दुसऱ्या दिवशीं रात्रीं तोच इसम दवाखान्यांत आला व कालच्या-प्रमाणेंच मोटरमधून डॉक्टरना घेऊन गेला. मोटरचें पडदे सोडलेले होते. डॉक्टरनीं मध्येंच पडदे हळूच उचलण्याचा यत्न केला. पण त्या फटींतून जोराचा पाऊस मात्र अंगावर आला. बाहेर गडद काळोख होता!

डॉक्टरनीं पुन्हा त्या मुलीची छाती बारकाईनें तपासली. तपासतां तपासतां त्यांची मुद्रा बरीच गंभीर होत चालली. त्यांनीं नाडी पाहिली-पण त्यांच्या पुष्कळशा चाचपण्यावरून नाडी नीट हाताला लागत नव्हती असें दिसलें. त्यांनीं हृदयाचे ठोके कर्णनलिकेनें ऐकले. तपासणी संपल्यावर त्यांनीं पुन्हा औषध हातांत टोंचलें. नंतर उभें राहून व क्षणभर कोणत्या शब्दांत बोलावें हें ठरवून ते म्हणाले,

" हिला हॉस्पिटलमध्यें नेलें पाहिजे—"

" काय इस्पितळांत! अरे राम!" तो इसम म्हणाला.

त्याच वेळीं ती बाईहि एकदम " अगबाई! नको ग बाई माझं लेकरूं इस्पितळांत " असें जरा ओरडूनच म्हणाली.

पण डॉक्टरांचा निश्चय दिसला. " नाहीं. हिला इस्पितळांत गेलेंच पाहिजे-हा इन्फ्लुएंझा आहे-इन्फ्लुएंझल न्युमोनिया. हा भयंकर सांसर्गिक रोग आहे. कायद्याप्रमाणें अशा रोग्याला एक-खोलीच्या चाळींत ठेवतां येत नाहीं. सध्यां तिला झाला आहे-उद्यां तुम्हांला होण्याचा संभव आहे-परवां मलाहि कदाचित् होईल-आणि कदाचित् लवकरच या चाळींतील सगळे त्याला बळी पडतील. किंबहुना हें शहर ओसाड पडेल! हा जगभर पसरेल. काय होईल आणि काय नाहीं सांगतां येत नाहीं. तिला हॉस्पिटलमध्यें गेलेंच पाहिजे. नाहीं तर सरकार तुम्हांला भाग पाडील आणि शिवाय दंड जबर होईल तो निराळाच!"

ती पोक्त बाई तर ओक्साबोक्सी रडूं लागली. " नाहीं ग बाई! माझी छकुली! माझ्या बाबीला नाहीं मी इथून हलूं देणार! इस्पितळ म्हटलं कीं अंगावर कांटा येतो! तिथं विष घालून मारतात म्हणे! त्यापेक्षां मरायची असली तर, देवा, माझ्या मायेच्या पदरांत मरूं दे!" असें म्हणत तिनें छबूला घट्ट धरून ठेवलें.

डॉक्टरांनीं बाईची पुष्कळ समजूत केली, पण व्यर्थ.

" डॉक्टरसाहेब–" तो इसम अत्यंत दीनवाणीनें म्हणाला. "डॉक्टरसाहेब, आईचं मन वेडं हें मला समजतं, पण मायेपुढं इलाज काय ? डॉक्टरसाहेब, कसंहि करा, पण हिला हलवायला लावूं नका. जरूरच असेल तर आम्हीं इस्पितळांत घेऊन जाऊं. पण आतां अर्ध्या रात्रींत कशी नेणार ?"

" त्याची सोय मी करतों–आतां ॲम्ब्युलन्स गाडी मागवितों—"

" पण मग आमचा पत्ता कळेल. डॉक्टरसाहेब, असे आम्हांला फशी पाडूं नका. आम्हीं कांहीं तरी व्यवस्था करूं. उद्यांपर्यंतचं तर औषध द्या. उद्यां पुनः तुम्हांला आणून दाखवतों. मग वाटलं तर नेऊं इस्पितळांत. डॉक्टरसाहेब, आमची अब्रु वांचवणं सर्वस्वी तुमच्या हातीं आहे."

" मग तुम्हीं असं करा. तुमच्या मोटरमध्यें घालून माझ्या दवाखान्यापर्यंत हिला घेऊन या–तिथून मी व्यवस्था करतों."

" असं कसं म्हणतां, डॉक्टर ? इस्पितळांत गेल्यावर साहजिकच आमची नाहीं नाहीं ती विचारपूस होईल–चौकशी होईल आणि आमचा अज्ञातवास व अब्रू एकदमच चवाठ्यावर येतील."

मधून मधून ती वृद्ध आईहि कांहीं म्हणत होती. "पोटचा गोळा! आजपर्यंत ती मला सोडून राहिली नाहीं. इस्पितळांत धस्फस् करतात. धड औषध पाजीत नाहींत. चुळकाभर पाणी मागितलें तरी हिडीसफिडीस करतात. जो तो येऊन छाती ठोकून पाहातो! अगबाई!"

" अहो, पण हा सांसर्गिक रोग आहे, नोटिफाएबल आहे, म्हणजे हा रोग सरकारांत कळवलाच पाहिजे–नाहीं तर मला दंड होईल. हें पहा, आतां वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. उच्छ्वासागणिक, खोकल्यागणिक ही मुलगी अत्यंत जालीम असे लक्षावधि जंतु वातावरणांत सोडून आसपासच्या लोकांना प्रत्यक्ष विष चारीत आहे. एकएक मिनिट थांबणें म्हणजे दहा पांच निरपराधी लोकांच्या खुनाचें पातक आपल्या माथ्यावर घेण्यासारखें आहे. तें कांहीं नाहीं. तुम्ही कोणीहि असा आणि तुमचें गुपित कांहींहि असो–मला सरकारांत वर्दी दिलीच पाहिजे. चला, तुमचा पत्ता आतां मला मिळालाच पाहिजे."

" असे निष्ठुर होऊं नका हो! अब्रू मनुष्याला जीवापेक्षां प्यार आहे. आम्हांला सवड द्या. उद्यांपर्यंत थांबा. उद्यां सकाळीं फिरून येऊन जा. सकाळीं पुनः परीक्षा करा. मग जरूर असल्यास आम्हीं नाइलाजास्तव तिला इस्पि-

तळांत पाठवूं. कारण तुम्हींच पहा. तिची हलण्याची तरी ताकद आहे का? गाडींतच जर बरं-वाईट—"

खरेंच! आमच्या स्टॅटिस्टिक्स-बहादुरांच्या लक्षांत ही गोष्ट आलीच नव्हती. तें त्यांचें म्हणणें डॉक्टरांना पटलेंसें दिसलें.

"हो," ते ह्मणाले "उद्यां पाठविली तरी चालेल. पण मला पत्ता पाहिजेच. मला केस रिपोर्ट केलीच पाहिजे."

इतक्यांत एक ट्रंक उघडून त्यांतून एक फडक्याचें दफ्तर काढून त्या बाईनें आपल्या मुलाजवळ दिलें. तो इसम म्हणाला, "सरकारांत जो दंड भरावयाचा तो इथेंच-तुह्मांला भरला तर-" असें ह्मणतच त्यानें दहा-दहांच्या दहा नोटा मोजल्या.

नोटा पाहातांच डॉक्टरांना घरभाड्याच्या वगैरे तुंबलेल्या बिलाची आठवण झाली. तो मोह अनावर होता.

"असलें कांहीं कराल तर मग मी ताबडतोब पोलीसच्या स्वाधीन करीन." डॉक्टर किंचित् रागावून म्हणाले.

"मग काय, करूं तरी काय!" त्या इसमानें डॉक्टरांचे पाय धरले व ते तो सोडीना. "आमची अब्रू वांचवा! माझ्या बहिणीकडे पाहा. आमच्या वृद्ध आईकडे पाहा!"

डॉक्टरनीं खरोखर तिकडे पाहिलें. आई खाटेच्या कडेवर डोकें ठेऊन स्फुंदत होती. छबू आपले खोल गेलेले डोळे उघडण्याचा यत्न करीत होती. तिचा श्वास जोरानें चालला होता व खोंकण्याची शक्तिहि तिच्यांत उरली नव्हती.

"डॉक्टरसाहेब, तुम्हांला आवडती बहीण असती आणि तुमच्यावर आमच्यासारखी स्थिति आली असती, तर तुम्हांला कसें वाटलें असतें? तुम्ही आपल्या धाकट्या बहिणीला इस्पितळांत पाठवाल का?"

डॉक्टरनीं एक दीर्घ श्वास सोडला. नोटांचें पुडकें त्या इसमानें त्यांच्या खिशांत कोंबलें, पण त्यांचें तिकडे लक्ष नाहींसें दिसलें. "पहा बुवा" इतकेंच त्यांनीं म्हटलें.

नंतर दोघेहि मोटरमधून दवाखान्यांत आले.

"उद्यां सकाळीं येतों" असें सांगून तो इसम औषध घेऊन निघून गेला.

डॉक्टरहि जावयाला निघाले. टोपी उचलून पहातात तों तिच्या खालीं आणखी १०–१० च्या पांच नोटा !!

क्षणिक मोहाला डॉक्टर बळी पडले होते. त्यांना पैशाचेंहि इतकें वाटलें नाहीं, पण त्या आईची केविलवाणी स्थिति, त्या भावाची ममता, त्या अगदीं तरुण मुलीचें बालिश मुखकमल! आणि एकंदर त्या कुटुंबावरील अज्ञात अरिष्टाबद्दल सहानुभूति. त्यांच्यावर असा कोणता भयंकर प्रसंग गुदरला असेल कीं त्यांनीं असे घाणींत अज्ञातवासांत दिवस कंठावे? त्या कुटुंबापैकीं एक एक व्यक्ति त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागली.

आईच्या तोंडावरील काळजीच्या सुरकुत्या, तिचे अर्धवट पिकलेले केंस, तिच्या डोळ्यांतील अश्रु!

तो तिचा मुलगा वयाच्या मानानें व्यवहारचतुर. बोलणें चालणें अदबीचें व खानदानींतील घराण्याच्या वळणाचें.

ती मुलगी बालिशता सोडून शारीरिक यौवनांत प्रवेश करण्याऐवजीं अनंत अशा अशारीरिक दशेंत जावयास निघालेली!

डॉक्टरांचें हृदय कळवळलें, व एक अत्यंत महत्त्वाचें कर्तव्य–जें करावयास पाहिजे होतें तें त्यांनीं केलें नाहीं. त्यांनीं त्या केसचा पत्ता काढून–तो इसम आतां दवाखान्यांत आला होता त्यावेळीं तें शक्य होतें–ती केस 'नोटीफाय' करावयास हवी होती.

दुसरा दिवस उजाडला. डॉक्टर दवाखान्यांत गेले. टेबलावरील कालच्या हस्तपत्रकासंबंधीं लिहिलेल्या टिपणावर त्यांची नजर गेली, व एकदम त्यांचे हृदय चरकलें.

अशी केस ताबडतोब कळविणें किती जरूर आहे यावर त्यांनींच एक पॅरा लिहिला होता; त्यांनीं मनाशीं वाचलें:—

"रोग्यासंबंधीं कांहीं गोष्टी गुप्त ठेवणें हें प्रत्येक चांगल्या डॉक्टरचें कर्तव्य असलें, तरी अशा रोगाबद्दल तेंच डॉक्टरी नीतिशास्त्र लावणें हा फौजदारी गुन्हा होईल."

"पैशाकरितां किंवा सहानुभूतीनें जो केस छपवून ठेवील तो समाजाचा शत्रुच होय."

ते आपल्याशींच म्हणाले, "येथें कोणती नीति लावावयाची! तत्त्वज्ञानांतील नीतिशास्त्र निराळें आणि व्यवहारांतील नीतिशास्त्र निराळें, आणि डॉक्टरी नीतिशास्त्र तें तिसरेंच! येथें कोणतें नीतिशास्त्र मी लागू करूं? तसेंच म्हटलें तर ही केस छपवून ठेवली तर काय हरकत आहे? समजा, तो इसम आपल्या-कडे आलाच नसता तर? एखादी गोष्ट–सजवावी तशी सजते. तिनें एक श्वास टाकला कीं लक्षावधि जंतु बाहेर पडतात–मिनिटांत इतके श्वास; तासांत त्याच्या साठपट! आंकडेशास्त्रच तें. चालला हिशेब वाढत! हा काय व्यव-हार झाला?"

बराच वेळ डॉक्टर विचारांत पडले. अखेर त्यांनीं एक निश्चय ठरविला. "खोट्या सहानुभूतीनें जो अशी केस छपवून ठेवील तो समाजशत्रुच होय!' हें वाक्य आपण कालच लिहिलें! एका कुटुंबाचे शत्रु होणार, कीं समाजाचे! उत्तर सोपें होतें.

तो इसम आला कीं, त्याचा पत्ता काढावयाचाच अशी त्यांनीं खूणगांठ बांधली. बऱ्या बोलानें त्यानें सांगितलें तर बरेंच, नाहीं तर त्याला पोलिसच्या स्वाधीन जरूर करावयाचा किंवा आपल्या गड्याला आपल्या मागोमाग नक-ळत यावयास सांगावयाचें. आतां इतक्यांत तो इसम येणारच होता.

पण किती वेळ झाला तरी तो इसम आलाच नाहीं! वाट पाहून डॉक्टर कंटाळले व थोडे साशंक झाले. दुपारीं तरी येईल, पण दुपारींहि त्याचा ठिकाण नव्हता! रात्रीं नेहमींप्रमाणें खास येणार असें त्यांस वाटलें. कारण दिवसा आपल्याला त्या घरीं न्यावयास तो कचरेल असा त्यांनीं तर्क केला. एकीकडून रात्रच त्यांनाहि सोयीची होती. म्हणजे ओळखूं न येतां त्यांच्या गड्याला त्याच्या मागोमाग दुसऱ्या मोटारींत–किंबहुना त्याच मोटरच्या मागें जातां आलें असतें.

पण भयंकर निराशा! तो इसम रात्रींहि आला नाहीं! आतां काय करावें? पत्ता कसा काढावा? त्यांना सुचेनासें झालें. संध्याकाळीं अदमासानें ते खूप हिंडले, पण त्या घराचा त्यांना मागमूसहि लागला नाहीं!

ते कोण लोक असतील? त्यांच्यावर कांहीं खोटा आळ आला असेल, कीं त्यांचें दिवाळें निघालें असेल? का ते कांहीं गुन्हा करून लपून बसले

असतील ? कुंटीणखाना तर नसेल–ती सुस्वरूप १४ वर्षांची पोर ! ती पळवून आणलेली तर नसेल ?

*　　*　　*　　*

आठ दिवसांनीं वर्तमानपत्रांत पुढील हकीगत प्रसिद्ध झाली:—

**" इन्फ्लुएंझाची भयंकर साथ.**
**तीन दिवसांत ७३ मृत्यू !**
**शहरवासीयांस इषारा".**

गेल्या आठ दिवसांत एका चाळींतील एकाच खोलींत लागोपाठ तीन मृत्यु झाले, यावरून येथील आरोग्यखात्यानें शोध करतां, ते इन्फ्ल्युएंझल न्युमोनियाचे ठरले. त्याच गल्लींत गेल्या तीन दिवसांत आणखी सत्तर लोक त्याच विकारानें वारले. आरोग्यखात्यानें घरें धुणें वगैरे प्रतिबंधक उपाय जोरांत अमलांत आणले आहेत. परंतु सर्व लोकांनीं सावधगिरी बाळगणें अगत्याचें आहे.

असें दिसतें कीं, तेलगू गल्लींतील एका चाळींत एका कुंटिणखान्यांत पहिली केस झाली. ती एक १४ वर्षांची मंगलोरी मुलगी होती. पण ती कोठून आली हें कळण्यास मार्ग नाहीं. लगोलग त्याच कुंटिणखान्यांतील एक वृद्ध कुंटीण व दुसरा एक तरुण मनुष्य मरण पावला. मंगलोरी मुलीचें दुखणें एक वर्षांचा जुनाट ताप, फारा दिवसांचा मलेरिया असें सांगण्यांत आलें होतें. म्हातारीचा रोग " दमा " असा नोंदला गेला होता व त्या तरुण मनुष्याला ' निमोनिया ' झाला आहे, असें शेजारी म्हणत होते. डॉक्टरचें औषध कोणींच केलें नव्हतें."

डॉक्टरनां काल संध्याकाळपासून बरें नव्हतें. आज सकाळच्या वृत्तपत्रांत त्यांनीं वरील मजकूर वाचला. तेलगू गल्लींतील चाळ म्हणजे त्यांच्या दवाखान्याच्या मागची. इतक्यांत त्यांच्या गड्याचा मोठा भाऊ येऊन सांगूं लागला कीं, लखू आजारी आहे त्याला बघायला चला !

पण डॉक्टरांना उठवेनासें झालें. कोणी तरी त्यांना हॉस्पिटलमध्यें नेलें. दुसऱ्या दिवशीं त्यांच्या शेजारच्या वार्डांत एक रोगी आला, लखूच तो ! संध्याकाळीं डॉक्टरांच्या डोळ्यांदेखत लखूनें राम म्हटले.

डॉक्टरांनींहि दुसऱ्या दिवसाची सकाळ पाहिली नाहीं ! !



# मातृपद-जिज्ञासा

[ ॲड्व्होकेट ऑफ इंडिआ, तारीख १-८-१९१४, शनिवारचें परिशिष्ट, या अंकांत आलेली प्रस्तुत लेखकाचीच 'टयुबर्क्युलर कॉमेडी' ही इंग्रजी गोष्ट मूलभूत धरून पुढील गोष्ट लिहिली आहे. ]

[ उपरिनिर्दिष्ट इंग्रजी गोष्टीचें सारः-डॉक्टर रामराव व नर्स सीताबाई यांचें लग्न ठरलें होतें. सीताबाई आजारी पडल्या व वेड्यांच्या इस्पितळावरील मुख्य डॉक्टर मेजर फूल्सहेड यानें तिला क्षयरोग झाल्याचें मत दिलें. अर्थात् क्षयरोगी असतां लग्न केल्यास आपल्या पतीला व होणाऱ्या मुलां-बाळांना व एकंदरींत समाजालाच धोका असल्यामुळें तिनें 'लग्न करणें आतां मला शक्य नाहीं !' असें दुःखातिशयानें पण निक्षून रामरावांना सांगितलें. रामरावांनीं तरीहि हट्ट धरला. पण व्यर्थ. इतक्यांत मेजर फूल्सहेडला वेड लागल्याची बातमी रामरावांनीं वर्तमानपत्रांत वाचली व सीताबाईला सांगितली. त्याच वृत्तपत्रांत असेंहि म्हटलें होतें कीं, मेजरसाहेबांनीं अलीकडे साध्या पडशा-खोकल्याच्या मुलींवर क्षय म्हणून खुशाल शिक्के मारले होते व वाटेल तें निदान वेडाच्या लहरींत ते करीत सुटले होते. सीताबाईचा 'क्षय' अर्थात् त्या वेडाच्या लहरींतील एक रोगनिदान समजून त्या दोघांचा वाङ्‌निश्चय पुनः कायम झाला. ]

*  *  *  *

परंतु त्या रात्रीं नर्सला पुनः शंका आली. मेजर फूल्सहेडनें जरी तिची छाती तपासली होती, तरी थुंकीची परीक्षा त्याच्या असिस्टंटनेंच केली असावी.

त्यांत जंतु सांपडले होते काय ? सांपडले नसल्यास मग काय ? कारण कित्येक वेळां एखाद्या नमुन्यांत जंतु असतात तर दुसऱ्या नमुन्यांत सांपडत नाहींत, किंवा कांहीं दिवस फुफ्फुसांतून जंतु बाहेर पडतात तर कांहीं दिवस ते लुप्तप्राय होतात, असें तिला माहीत होतें. कदाचित् फुफ्फुसांतील क्षयाचा विकार आटोक्यांत आला, अगर थांबला, तर ते दिसेनासे होतात; पण पुनः कांहीं कारणानें रोग वाढल्यास अगर जोरावल्यास ते पुनः दिसूं लागतात हेंहि

तितकेंच खरें होतें. जंतु नाहींत म्हणून क्षय नाहीं असें म्हणणें धाडसाचें होय. तिच्या समाधानाकरतां रामरावांनीं आठ दिवस रोज एक एक नमुना तपासला, पण एकहि जंतु आढळला नाहीं. पण तिचें मन स्वस्थ होईना. आज नमला, आठ दिवस नसला, तर पुढें महिन्यानें कदाचित् दिसेल ! हाच एक रोग तिला लागला. किंबहुना एकदा जंतु सांपडला असता तर कांहीं तरी एक गोष्ट साधारणपणें निश्चित तरी झाली असती ! !

पण प्रथम जेव्हां मेजर फूल्सहेडच्या मदतनिसानें तपासलें तेव्हां जंतु सांपडलेले असले तर व त्यावरूनच निश्चितपणें मेजरसाहेबांनीं रोगनिदान केलें असेल तरच हल्लींच्या सगळया भीतीला कारण होतें. मात्र त्यावेळीं जंतु सांपडले नसतील तर मग प्रश्नच नव्हता. अर्थात् एक प्रकारें गोष्टीचा छडा लावणें शक्य होतें व एका दृष्टीनें इष्टहि होतें.

कांहीं कारणानें नर्सला आपल्या गांवीं जाण्याचा योग लवकरच आला व त्या मदतनीसाकडे जाऊन चौकशी करण्याचें तिनें ठरविलें. तिला पाहातांच असिस्टंटसर्जन–डॉक्टर शामराव अमळ आश्चर्यचकितच झाले. त्यांना काय वाटलें कोण जाणें ! जणों एखाद्या मृत मनुष्याचें भूतच त्यांच्या पुढें उभें राहिलें ! त्यांची अशी कल्पना होती कीं, ही नर्स एव्हांना परलोकाला गेली असावी, निदान वाट चालत असावी ! परंतु ती साक्षात् मूर्तिमंत त्यांच्यापुढें उभी होती. डॉक्टर शामरावांना चक्क आठवत होतें; कांहीं दिवसापूर्वीं हीच नर्स तपासून घेण्याकरतां आली होती, व त्यावेळीं तिच्या थुंकीत क्षयाचे जंतु सांपडले होते !

नर्सनें आपल्या आजाराची सर्व हकीगत डॉक्टर शामरावांना सांगितली. तिला पुनः तपासून ते म्हणाले, " भिण्याचें कारण नाहीं. फुप्फुसांतील नवीनच क्षयरोग बरा होऊं शकतो. अन्य कारणानें मेलेल्या कित्येक लोकांच्या फुप्फुसांत पूर्वीं क्षय होऊन बरा झाल्याचीं चिन्हें दिसतात. एकंदरींत तुमच्या हकीगतीवरून व माझ्या आत्तांच्या तपासणीवरून तुमचीं फुप्फुसें विशेष बिघडलेलीं नसावीं, असें वाटतें. मागें मी पाहिलें तेव्हां थुंकींत क्षयाचे जंतु निःसंशय होते." नर्स दचकली, व लक्ष लावून ऐकूं लागली. " आतां जंतू नाहींत म्हणतां, पण......तुम्हांला काळजी घेतली पाहिजे. एखाद वेळ रोग उलटायचा. कारण तुमची अंगलट ज्याला

ब्लॉड म्हणतात तशी आहे, शिवाय प्रकृतिहि अमळ बेताचीच दिसते. तेव्हां तुम्हीं औषध तर चालू ठेवाच, पण विशेषतः इतर आरोग्याकडेच अधिक लक्ष पुरविलें पाहिजे. तुम्ही नर्सच आहां-तें तुम्हांला सांगायला नकोच. स्वच्छ, कोरडी, मुबलक हवा, साधें, हलकें व सत्त्वशील अन्न, बेताचा व्यायाम, आणि मनाची शांति,-मी तुम्हांला भेवडावण्याकरतां सांगत नाहीं, तर त्यांचें महत्त्व बिंबवण्याकरतां. कारण स्वतःच्या तसेंच सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीनें विशेषतः आपल्यासारख्या डॉक्टरीच्या धंद्यांतल्या लोकांनीं तर विशेष खबरदारीनें राहणें किती जरूर आहे, हेंहि तुम्हांला सांगितलें पाहिजे असें नाहीं."

सीताबाई घरीं आली. तिचें चित्त अधिकच अस्थिर झालें, डॉक्टरनां निःसंशय जंतु सांपडलेले होते. 'सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीनें' असें डॉक्टर म्हणाले, त्याचा काय अर्थ? क्षयरोगाचा मनुष्य आपल्या उच्छ्वासावाटे व थुंकींतून भोंवतालची हवा दूषित करीत असतो व न जाणून सगळीकडे विष पेरीत असतो या अर्थानेंच ते म्हणाले काय? कीं याहून कांहीं खोल अर्थ त्यांत होता? आपल्या लग्नाचा बेत त्यांना माहीत होता? व त्याला अनुलक्षून ते म्हणाले नसतील ना! मग अशा स्थितींत लग्न करणें इष्ट आहे काय? ही गोष्ट-पूर्वी जंतु सांपडल्याची गोष्ट, रामरावांना कळवावी काय? कळविली तर त्यांना काय वाटेल! पण इतकी घाई कां! वाट पाहूं. लग्न लागायला तसा अवकाश आहे. तेवढ्यांत बरी झालें तर ठीकच, नाहीं तर तोच पूर्वीचा निश्चय कायम!

* * * *

मध्यंतरी रामरावांना एक शिष्यवृत्ति मिळून त्यांचें विलायतेला जावयाचें ठरलें. सीताबाई अत्यंत दुःखी व निराश दिसत होती. पण तसें वियोगामुळें असेल असेंच अर्थात् रामरावांना वाटलें. हें खरें होतेंच, पण सीताबाईला मुख्य काळजी आपल्या संशयित क्षयाची होती. व तीच चिंता त्यांना जाळीत होती. त्यांत आतां रामरावांच्या वियोगाची भर पडली. ते निदान एक वर्ष येणार नव्हते.

एकीकडून रामराव विलायतेला एक वर्ष जाणार हें फायदेशीर होतें. परत येईपर्यंत अर्थात् विवाह लांबणीवर टाकणें पुष्कळ दृष्टीनें इष्ट होतें.

रामराव गेले आणि सीताबाई आजारी पडली. तिला संध्याकाळचा बारीक ताप येऊं लागला. रात्रीं घाम सुटूं लागला. थोडा खोकलाहि सुरू झाला, व त्या अशक्त झाल्या. क्षयाची बाधा असावी असें डॉक्टरांचें म्हणणें पडलें पण थुंकींत जंतु नव्हते. तरी पण अशा स्थितींत नर्ससारखें काम करणें स्वतःला तितकेंच रोग्यांना अपायकारक होतें. मुंबईंत राहणें शक्य नव्हतें. ती आपल्या गांवाला जाऊन राहिली.

दिवसेंदिवस ती अशक्त व क्षीण होत चालली आणि वजनहि कमीकमी भरूं लागलें. डॉक्टर रामरावांकडे ती गेली. " या रोगांत फुप्फुसांतील विकार-चिन्हांपेक्षां लक्षणावरच अधिक भर असतो." ते म्हणाले " पण पुनः एकदा आपण थुंकी तपासूं. खोकला कसा काय आहे ?"

खोकल्याचें नांव काढतांच तिला खरीच खोकल्याची ढांस आली. टेबला-जवळच एक एनॅमलची पिकदाणी होती. त्यांतच थुंकण्यास डॉक्टरनीं तिला सांगितलें.

एका दोनबोटायेवढ्या कांचेवर तो नमुना त्यांनीं घेतला, व निरनिराळीं औषधें व रंग त्यावर घालून व जाळावर धरून वगैरे बरेंचसें क्रियाकर्म मोठ्या काळजीपूर्वक केलें.

" आतां पाहूं." ते म्हणाले.

सीताबाई वरील सर्व कृति लक्ष लावून पाहात होती. आतां काय दिसतें आणि काय नाहीं इकडे तिचें चित्त लागलें. कांच तर रंगवून तयार झाली. थोडीशी वाळल्यावर डॉक्टर रामरावांनीं ती सूक्ष्मदर्शकयंत्रावर चढविली व एक डोळा नळीवर ठेवून व एका हातानें फोकसचा स्क्रू इकडे तिकडे फिरवीत ते पाहूं लागले.

सीताबाईची छाती धडधडूं लागली. ती कांच काय सांगणार ? लग्नाला परवानगी देणार कीं, अशीच कुंवारपणांत झिजून झिजून मर, असा शाप देणार ? रामरावांच्या प्रेमळ सहवासांत सुखानें संसार करून मुलाबाळांना हाताखांद्यावर खेळव म्हणून अनुमोदन देणार, कीं जन्मभर ( किंवा मरेपर्यंत म्हटलें तर अधिक सयुक्तिक दिसेल ) लोकांच्या संसाराकडे–लोकांच्या मुलां-बाळांकडे आशाळभूतपणानें पहात शारीरिक व मानसिक दुःखांत–हालअपेष्टांत दिवस काढायला लावणार ?

शामरावांच्या हाताच्या हालचालीकडे तिचे डोळे व ते आतां काय सांगतात इकडे तिचे कान लागून राहिले होते. त्यांचा चेहरा त्यांच्या डाव्या हाताच्या आड असल्यामुळें व ते वांकून यंत्रांत पाहात असल्यामुळें त्यांची चर्याहि धड दिसत नव्हती.

आपल्या आयुष्याची सगळी मदार आतां डॉक्टरांच्या निकालावरच जणों अवलंबून आहे अशा भावानें ती आतुरतेनें बसली होती. यापूर्वी तिची थुंकी अनेक वेळां तपासली गेली होती, पण ती तिच्या अपरोक्ष. व त्याचा निकाल तिला एकदम कळत असे. पण आज पहिल्यापासून अखेरपर्यंतची सर्व कृति तिच्या डोळ्यांदेखत होत असल्यामुळें तिची वृत्ति अत्यंत संशयित व भीतिग्रस्त झाली. जंतु सांपडले नाहींत तर कांहींच सिद्ध होणार नाहीं. सांपडले तर मात्र फार भयंकर होतें!

मधूनच डोळ्याला विसावा देण्याकरतां नळीच्या लेन्सवरून डोळा काढून डाक्टर बाजूकडे वर पाहात. मध्येंच त्यांनीं एक सिगारेट शिलगावली. केव्हां वांकड्या डोळ्यानें बाहीच्या आडून ते नर्सकडे पाहात. बराच वेळ कांच मागें पुढें वरखाली सरकावून पाहिल्यानंतर डोळा नळीवरच ठेवून व डाव्या हातानें स्क्रू खालीं वर फिरवीतच ते म्हणाले—"नाहीं-कांहीं दिसत नाहीं."

नर्सला इतका आनंद-हर्षातिरेक झाला कीं, ती एकदम स्टुलावरून उठली व डॉक्टरांच्या अगदीं जवळ जाऊन व त्यांच्या डाव्या हाताची बाही हलवून म्हणाली, "नाहीं? नाहीं ना? मग आतां मला लग्न करायला आडकाठी"—इतकें म्हणून तिनें जीभ चावली.

"लग्न—" तिच्या हाताखालून बाही काढून घेऊन व एकदम तिच्याकडे मान वळवून डॉक्टर आश्चर्यानें उद्गारले, "धडधडीत फुप्फुसांत क्षयरोगाचे जंतु धुडगुस घालीत असतां लग्न?—" डाक्टरनींहि तेवढ्यांत बोलणें आखडतें घेतलें.

"म्हणजे तुम्हींच ना आतां म्हणालां जंतु नाहींत म्हणून?" क्षणभर डॉक्टर कांहींच बोलले नाहींत. "माफ करा" ते नम्रतेनें म्हणाले, "तुमची घाबरलेली मुद्रा पाहून मी पुष्कळ विचारांतीं मघां खोटें सांगितलें. यांत जंतु आहेत. पण तुम्ही अधिकच घाबराल म्हणून नाहीं म्हटलें. पण आतां तुम्हीं लग्नाची गोष्ट काढलीत व अशा स्थितींत लग्न करण्यापासून होणाऱ्या दुष्परि-

णामाचें कल्पनाचित्र माझ्या डोळ्यांपुढें एकदम उभें राहून मी खरें बोलून गेलों. एका अर्थी बरेंच झालें. रोग्यांना कित्येकदां खरें सांगणें समंजसपणाचें असतें व केव्हां खोटें सांगणें इष्ट असतें. मघां खोटें सांगणें मला इष्ट वाटलें, पण आतां लग्नाच्या गोष्टीमुळें खरें सांगणें शहाणपणाचें होणार आहे. होय, या कांचेवर जंतु स्पष्ट दिसताहेत."

नर्सनें टेबलावरच डोकें टेकलें. तिला भोंवळ आली.

* * *

अतृप्त इच्छा केव्हांहि वाईटच. त्यांतून इच्छेप्रमाणें होण्याचा योग आला असतां मध्येंच त्याला खो बसला तर अतिशयच निराशा. तशांत, फार दिवस मनांत घोळत असलेली इच्छा परिपूर्ण होत नसेल तर ती इच्छित गोष्ट आतां हवीशी वाटत नसली तरी केवळ तिच्या चिरसहवासामुळें ती सफल व्हावी असें मनापासून वाटतें.

जोंपर्यंत जंतु नव्हते तोंपर्यंत लग्न न करण्याचा तिचा दृढनिश्चय कायम होता. परंतु आतां जंतु सांपडले असतां—म्हणजे ज्या स्थितींत तिचा निश्चय दृढतर व्हावयास पाहिजे होता ती वेळ येऊन ठेपली, तेव्हां नर्सची विलक्षण चलबिचल होऊं लागली.

मेजर फून्सहेडनें तपासलें त्या वेळींच जंतु सांपडले आहेत असें कळतें, तर येथपर्यंत—या थरावर गोष्टच आली नसती—तिनें येऊं दिली नसती. मागेंच तो वाङ्निश्चय तिनें ठाम शब्दांत मोडला होता. व डॉक्टर रामरावांनीं कितीहि गळ घातली असती, पदर पसरला असता, तरी नर्स आपल्या कृत-निश्चयापासून ढळली नसती—समाजकर्तव्याला पराङ्मुख झाली नसती. तिला कोडेंच पडलें नसतें.

पण, त्याच गोष्टीचा असा विचका होत गेल्यामुळें एकदा होय, एकदा नाहीं—एकदा आशा—एकदा संशय—या भानगडीमुळें तिचा समतोलपणा बिघडला. रामरावांचें विलायतेला जाण्याचें ठरलें नसतें तर त्यांचें एव्हांना दुसरीशीं लग्न झालें असतें. पण ते विलायतेला गेल्यामुळें नर्सला विचार करण्यास अवसर मिळाला. कोणत्याहि साधारण संशयित गोष्टींत विचार करण्यास वाजवीपेक्षां फाजील अवकाश मिळाला म्हणजे आटपलेंच! नवीनच गोष्ट ठराविक मुदतींत करावयाची असल्यास शहाणा मनुष्य पूर्वग्रहदूषित नसल्यास

झटकन् योग्य निकाल करून मोकळा होतो, पण तोच शहाणा मनुष्य हवा तेवढा विचार करण्यास वेळ मिळाला म्हणजे अधिकच संशयग्रस्त होत जातो. चांगल्या वाईट गोष्टींचें कमीअधिक वजन त्यावर पडण्यास संधि मिळते व तो भांबावून जातो. असेंहि साहजिक होतें कीं, त्यामुळें मुदत संपण्यापूर्वी जरी त्यानें चांगली गोष्ट करण्याचेंच ठरविलें असलें तरी ती वेळ भरत आली, व कांहीं तरी आतां निकाल केलाच पाहिजे अशी आणीबाणीची वेळ येऊन ठेपली म्हणजे-तो मनुष्यच असल्यामुळें-सर्वांत सोपी गोष्ट करण्याचेंच ठरवितो. स्वार्थाकडेच झुकतो ! !

नर्स मुंबई सोडून नुकतीच गांवाकडे गेली तेव्हां तिला 'नको ती मुंबई फिरून !' असें झालें होतें. तिची आत्या अत्यंत प्रेमळ होती. तिच्या घरांतील इतर मंडळींनांहि नर्स अगदीं हवीशी वाटे. मुंबई शहराला कंटाळण्यापेक्षां तेथील राहणीचा त्यांतल्यात्यांत स्वतःच्या नर्सच्या राहणीचा तिला वीट आला. बारा महिने अठरा काळ तीच रहाटी, तेच तें चक्र. त्यांत काडीचा फरक म्हणून नाहीं. सिनेमा पाहाणें हा देखील चैनीचा-गमतीचा प्रकार-पण तोहि जसा रहाटगाडग्यांतला ! त्या चैनींत तरी नाविन्य पाहिजे. घंटा झाली-उठा, घंटा झाली-जेवा, काम, झोंप, सगळें घंटेवर ! आतां रामरावहि नव्हते व प्रकृतीच्या दृष्टीनें तर मुंबईला राहाणें घातुक होतें.

म्हणून ती आपल्या घरींच रमली. तिच्या आतेभावाचें नुकतेंच लग्न झालें होतें. घरीं मंगळागौरी, संपत शनिवार, शिवामुठी यांचा धूमधडाका चालला होता. तिची आतेबहिण तेथेंच होती व तिच्या मुलांना घेण्यांत नर्सला फारच गंमत व कौतुक वाटे.

· तथापि एक प्रश्न तिला हवालदिल करीत होता. आपल्याला क्षय झाला आहे यांत शंका नव्हती. तिचे आईबाप क्षयानेंच वारले होते असें तिला आतां नीट समजलें होतें. तिची शरीरघटना 'क्षयी' होती, वर्ण फिकट गोरा, शरीर सडपातळ, लांब अणकुचीदार बोटें, पातळ व मृदु कातडींतून दिसणाऱ्या निळसर शिरा ! तो प्रश्न हाच कीं, ही गोष्ट रामरावांना कळवावी कीं कसें ! आपला रोग ते परत येईपर्यंत बरा होण्याचा संभव आहे, तेव्हां कशाला उगीच कळवा ? शिवाय त्यांना उगीच काळजीहि लागून राहील. आपणाला क्षय झाला असतांनादेखील ते लग्नाला कबूल झाले होते, हें तिला आठवलें व

आठवून आनंद झाला तितकेंच वाईट वाटलें. तिच्या सध्याच्या रोगावस्थेंत लग्न करणें शक्य नव्हतें ना? मग असे चोरटे चोरटे विचार तिच्या मनांत कां येत होते? म्हणजे ती आज लग्नाला उभी राहिली असतीच असें नव्हे. पण कांहीं चलबिचल, भयंकर क्रांति तिच्या अंतःकरणांत होत होती. शेजारच्या परिस्थितीचा तिच्या मनावर पगडा बसला होता काय? वहिनीच्या मंगळागौरी, तिच्या शिवामुठी, आतेबहिणीच्या मुलांची क्रीडा यामुळें ती भारली गेली काय? मग तिला आतां असें कसेंसेंच कां वाटूं लागलें? हा रोग असाच वाढत गेला तर आपली शाश्वति तरी किती दिवस आहे!

परंतु अतःपर डॉक्टर शामरावांच्याकडे शंकासमाधानार्थ जाणें तिला पसंत पडेना पण उगीच भलत्या डॉक्टरपुढें जाणेंहि गैरशिस्तच होतें. धीर करून ती शामरावांच्याकडे गेली.

"अजून भिण्याचें कारण नाहीं." ते म्हणाले, "तुम्हीं अगदीं घाबरूं नका. भीति हाच अर्धा रोग होऊन बसतो. जंतु सांपडले म्हणजे कांहीं मृत्यूचा पास आणायला जायचें नाहीं. माफ करा. पण तुम्ही नर्स लोक म्हणजे अर्धवट माहितीनें कांहींतरी धरून बसतां! अहो, म्हटलें आहे, 'शेतकऱ्याचें सगळेंच बीं रुजून फळ धरतें का? कांहीं बिया रस्त्यावर पडतात व वाळून जातात किंवा कोंबड्या खाऊन टाकतात. कांहीं खडकावर पेरल्या जातात व मरतात. कांहीं मातींत रुजतात पण हरळीमुळें त्यांची वाढ खुंटते. मात्र कांहीं भुसभुशीत जमिनीवर पडतात, रुजतात व फळ धरतात. त्या रस्त्यावर पडलेल्या बिया म्हणजे आपल्या आसपास रस्त्यावर वगैरे पसरलेले जंतु–पुष्कळसे तसेच मरतात. खडकावरील बिया म्हणजे–त्या सुदृढ शरीरांत शिरलेले जंतु–ते थोडेसें नुकसान करतात, पण पुढें त्यापासून कांहींच होत नाहीं–ते मूळच धरीत नाहींत. शरीरांतील संरक्षक पदार्थांनीं आटोक्यांत आणलेले जंतु म्हणजे त्या हरळीखालीं दडपले गेलेलें बीं. आणि भुसभुशीत जमिनींत रुजलेलें व मुबलक फळ धरणारें बीं म्हणजेच जगांतील मृत्यूपैकीं एकदशांश मृत्यु!

हाय! ह्यांतली सर्वांत शेवटची जात नर्सशीं बहुतेक जुळणारी होती!

परंतु आपण आणखी किती दिवस जगूं हा जो मुख्य रोखठोक प्रश्न विचारण्याकरतां ती आली होती, त्याचें काय? तो प्रश्न कोणत्या शब्दांत विचारावा?

"मी किती दिवसांत-झालेंच तर-बरी होईन ?"

"हं." करून डॉक्टर हंसले.

"पण बरें व्हायला किती दिवस लागतील ?" तिनें पुनः विचारलें.

पुनः डॉक्टरनीं हंः केलें. मग ते धीर देण्याच्या उद्देशानें पण सावधगिरीनें म्हणाले, "त्याचें काय सांगावें ? सहा महिन्यांनीं व्हाल, वर्षहि लागेल, किंवा उद्यांपासूनहि बऱ्या व्हायला लागाल !"

"पण होईन ना ? सहा महिन्यांनीं-वर्षांनीं दोन वर्षांनीं—"

पुनः डॉक्टरनीं 'हंः !' केलें.

परंतु नर्सचें समाधान होईना. दुसऱ्या एखाद्या डॉक्टरला विचारण्याचें तिनें ठरविलें. 'तुम्हीं आठ दिवसांत बऱ्या व्हाल व मग लग्न करायला हरकत नाहीं' ! असें सांगणारा डॉक्टर भेटेपर्यंत ती डॉक्टर धुंडणार होती काय ? वेडी कुठली !

पण संसाराचा पाश-विवाहाचा मोह-आई होण्याची उपजत बुद्धि-कोणाला वेडी करणार नाहीं !

नर्सच्या एकाकी जीवनाचा-त्या एकलकोंडेपणाचा तिला वीट आला होता. नर्सच्या कामाचा तिला कंटाळा आला नव्हता. पण संसार करून तिला मुलें मांडीवर खेळवायचीं होतीं. अतिथि-अभ्यागत, पै पाहुणा, सणवार तिला साजरे करावयाचे होते.

ती मुंबईस कांहीं निमित्तानें गेली, व आपल्या डॉक्टरचा सल्ला घेण्याचें तिनें ठरविलें. कारण रामराव आतां विलायतेहून परत यायला झाले होते, व कांहीं तरी बेत कायम करणें अपरिहार्य होतें.

परंतु तितक्यांत तिला कळलें कीं, त्याच दिवशीं 'क्षयरोग आणि आरोग्य' या विषयावर एका विलायतेहून परत आलेल्या त्याच विषयांतील विद्वान् तज्ज्ञ डॉक्टरचें खाजगी व्याख्यान होतें. व सर्व नर्सेसना ऐकावयाला बोलावलें होतें. ही संधि तिनें वायां जाऊं दिली नाहीं. इतर नर्सेसबरोबर तीहि व्याख्यानाला गेली.

* * * *

"...आतां मला एका महत्त्वाच्या मुद्याकडे वळलें पाहिजे." व्याख्यात्यांचें चाललें होतें. "या उपविषयाकडे अद्याप आमच्या लोकांचें जावें

तितके-नव्हे-मुळींच लक्ष गेलेलें नाहीं. आणि याचें कारण म्हणजे-अज्ञान,-क्षयरोगाच्या-फुप्फुसांतील क्षयरोगाच्या कारणासंबंधीं व त्याच्या सर्वसाधारण स्वरूपाबद्दल कींव करण्याजोगें अज्ञान, गाढ अज्ञान आणि कांहीं धार्मिक समजुती. डॉक्टरचें काम औषध देण्यापलीकडे नसतें असें नाहीं. त्यांनीं व्यक्तिविषयक आरोग्याच्या सार्वजनिक आरोग्याच्या बाबतींत घालावें तसें लक्ष अद्याप घातलेलें नाहीं, ही दुःखाची गोष्ट आहे. औषध देण्यापुरतेंच नव्हे, तर समाजाच्या आरोग्यसंरक्षण-संवर्धनासंबंधीं आपल्या रोग्यांमध्यें व इतर लोकांतहि ज्ञानाचा फैलाव करण्याचें पवित्र कर्तव्य त्यांजकडे असावयास पाहिजे. व प्रत्येक रोग्याला त्यानें आरोग्याचे साधारण नियम समजावून सांगून, त्यांचें महत्त्व त्याच्या मनावर बिंबविलें पाहिजे. तो जर अमुक रीतीनें न वागेल तर कांहीं सांसर्गिक रोगांत आपलें, आपल्या बायकामुलांचें व समाजाचें आपल्या हातानें कसें नुकसान करील या गोष्टी त्याच्या मनावर ठसविल्या पाहिजेत. फक्त त्या रोग्याच्या दृष्टीनेंच नव्हे, तर समाजहिताच्या दृष्टीनेंहि त्यानें आपली 'केस' चालविली पाहिजे. असो. तर आज ज्या महत्त्वाच्या मुद्याकडे मी तुमचें लक्ष लावणार आहे तो मुद्दा म्हणजे 'क्षयरोग आणि विवाह' हा होय.

मीं तुम्हांला सांगितलेंच कीं, एक प्रकारच्या जंतूमुळें होणाऱ्या रोगसमुच्चयाला क्षयरोग अशी संज्ञा आहे. तो रोग हाडांत होऊं शकेल-त्याला कोणी हाड्यावर्ण म्हणतात. तो रोग गांठीमध्यें होऊं शकेल. गळ्यांतील गांठींत झाल्यास त्यालाच आपण गंडमाळा म्हणतों. तो रोग फुप्फुसांत होऊं शकेल-त्याला आपण सर्वसाधारणपणें क्षय म्हणतों. किंवा तो शरीराच्या कोणत्याहि भागांत होईल-त्याला न समजून वाटेल तें नांव देण्यांत येतें. ज्या द्वारांतून जंतु प्रवेश करतील किंवा शरीरांतून रक्ताबरोबर किंवा लशीबरोबर प्रवास करतांना अडकतील त्या ठिकाणीं ते आपलें घर करतात. व या गोष्टीवरच तो क्षय कोणत्या भागाचा होणार आहे हें अवलंबून असतें. जोरकस बीं व भुसभुशीत जमीन मात्र पाहिजे. अर्थात् त्या ठिकाणीं घर केल्यानंतरहि तेथून स्थानत्याग करून, त्यांतील कांहीं जंतु अन्य भागांत सफर करून छावणी घालतातच. पण सांगण्याचा मुद्दा असा कीं, कित्येकदा ते अशा ठिकाणीं असतात कीं, त्यांना शरीरांतून बाहेर मोकळ्या हवेंत जाताच येत नाहीं-उदाहरणार्थ हाडांत

असल्यास. पण फुप्फुसांत जर ते वाढत असले तर नाकातोंडावाटे बाहेरील हवेंत येणें त्यांना सोपें असतें. जसें, खोंकल्याच्या ढांसेबरोबर, मोठ्यानें बोलतांना, नाक शिंकरतांना वगैरे. साध्या उच्छ्वासांतील हवेंत ते जंतु नसतात, तर त्यांतील लाळ, शेंबूड अशा तऱ्हेच्या पदार्थाला चिकटून ते बाहेर पडतात. अर्थात्, समाजाच्या दृष्टीनें पाहिलें तर फुप्फुसाचा विकार झालेला क्षयरोगी अत्यंत अपरिमित नुकसान करीत असतो. आपल्याच घरांतल्या, रस्त्यांतल्या, आगगाडींतल्या मनुष्यास तो दूषित करीत असतो. मग पतिपत्नी-संबंध लक्षांत घेतल्यास त्यांपैकीं एखाद्याला जर क्षयाची बाधा असली, तर त्यामुळें दुसऱ्यालाहि ते रोगजंतु गिळंकृत करून त्याच रोगाला बळी पडायला किती उत्तम संधि असते हें आपण लक्षांत आणा. आणि क्षयरोग किती भयंकर असतो हें यावरून जाणून अशा लग्नासंबंधाच्या युक्तायुक्ततेविषयीं आपण विचार करा. ज्या दांपत्यापैकीं एकाला लग्नानंतर क्षयरोग झाला आहे, त्याबद्दलहि सावधगिरीनें वागलें पाहिजे. समजा, पत्नीला क्षय झाला आहे. तरी तिच्या सुखाकडे पाहतांना, तिजबद्दलचीं कर्तव्यें करतांना, दोघांनींहि समाजाकडे दुर्लक्ष करतां कामा नये. तिला जरी त्यानें लग्नाच्या वेळीं कांहीं वचनें दिलीं असलीं, तरी तिच्यापेक्षां समाजाचें हितच त्यानें अधिक पाहिलें पाहिजे. कारण तो जन्मला तेव्हांच समाजसेवेचा, समाजकर्तव्याचा बोजा घेऊनच तो जन्माला आला. लग्नांतील शपथा त्यानें मागाहून घेतल्या. तिच्यापासून त्याला क्षय होईल, त्याच्यापासून दारोदर क्षयाचे जंतू पसरण्याचें काम दुप्पट होईल, व त्यांच्या भावी संततीलाहि सर्वच अपायकारक आहे.

अगोदरच लग्न झालेल्या लोकांची गोष्ट ही झाली. यांत सध्यांच्या स्थितींत आपल्याला विशेष फरक-अनेक अडचणीमुळें-करतां येईल असें वाटत नाहीं. सगळा उपदेश उपड्या घागरीवरील पाण्याप्रमाणेंच होण्याची भीति आहे म्हणून आपण स्वस्थ बसणें मात्र युक्त होणार नाहीं. पण ज्यांचें अद्याप लग्न झालेलें नाहीं त्यांच्या बाबतींत कांहीं तरी आशा करायला जागा आहे. गळक्या घागरींतील पाणी !-इतकाच फरक. कारण, संसारांत पडण्याचा मोह अनावर आहे. विशेषतः भोंवतालची परिस्थिति पाहून तिकडे ओढा साहाजिकच जाणार आणि विशेषतः बायकांच्या बाबतींत हा प्रश्न जितक्या महत्त्वाचा तितक्याच गुंतागुंतीचा होतो. कारण, लग्न न करतां राहणें-पवित्र किंवा अपवित्र-

पुरुषास शक्य आहे तितकें तें बायकांस सुलभ नाहीं. शिवाय गर्भारपण-बाळंतपण यामुळें त्यांना अधिकच धास्ती असते. तसेंच संसार करण्याची इच्छा पुरुषांपेक्षां स्त्रियांतच अधिक आहे. एखाद्या मुलीला जर क्षयरोग झालेला असेल ( फुप्फुसांतील ), तिचा जर लग्न करण्याचा विचार असेल, आणि ती जर मला विचारील, तर मी त्रिवार मोठमोठ्यानें ठांसून एकच उत्तर देईन कीं, 'मुली, तूं लग्न करूं नको-लग्न करणें हा तुझा धडधडीत गुन्हा होईल-पोलिसकोर्टांतला नव्हे तर ज्या देवब्राह्मणांसमक्ष तूं लग्न करशील त्या देवब्राह्मणांचा-समाजाचा-मानवजातीचा. अखिल मानवजातीच्या आरोग्याला, भावी पिढीला आणि प्रत्यक्ष नवऱ्याला कीड लावण्याचें पातक तुझ्या हातून घडेल. मला माहीत आहे यांत तुझा दोष नाहीं-निदान सर्वस्वी नाहीं. पण अविवाहित राहून तूं 'मार्टर' होशील. स्वतःच्या संसाराकडेच तूं पाहणार कीं विश्वसंसार सुखानें चालावा हें तुला अधिक पसंत आहे? आणि स्वतःचा संसार तरी तुझा सुखाचा होईल काय?-कोण जाणे! नव्हे, खात्रीनें तो तापदायकच होणार. तुला, तुझ्या पतीला आणि मुलांबाळांना-आणि हीं मुलेंबाळें मांडीवर खेळवायला तूं असशील कीं नाहीं कोणास ठाऊक? हीं मुलेंबाळें तरी होतीलच असें कोणीं सांगावें? झाल्यास तीं आईच्याच वळणावर जायचीं. हाडकुळीं, फिकीं, लहानगट-आणि तीं जगांत आणून तूं त्यांना सोडून जाणार. कशाकरतां तर त्यांनीं वंशपरंपरेनें असाच क्षय पुढें चालू ठेवावा म्हणून!!! मग सांग-हा आत्मक्षय, वंशक्षय, समाजाचा आरोग्यक्षय करायला तूं प्रवृत्त होणार काय?

तात्पर्य काय, पुष्कळ गोष्टीसंबंधीं आपल्याला गाढ अज्ञान असतें. कांहीं ऐकून माहीत असतात, पण त्यांविषयीं आपण विचार करीत नाहीं. व कांहीं कळतात पण वळत नाहीं—"

या भाषणाचा नर्सच्या मनावर परिणाम न होणें शक्य नव्हतें. तें भाषण ती कान लावून ऐकत होती व कांहीं कांहीं प्रसंगीं तर ती दचके. त्या भाषणाचा इष्ट असाच परिणाम तिच्या मनावर झाला. तिच्या विवेकावर आलेलीं अभ्रपटलें दूर झालीं व वादळानंतरच्या सूर्यप्रकाशाप्रमाणें तिचें अंतःकरण धुवून शुभ्र झालें. 'काय मी वेडी! गोष्ट इतकी उघड असतां विचारच कां पडला?' असें ती मनाशींच म्हणाली, व अविवाहित राहाण्याचा निश्चय काय म

करून ती स्वस्थ झोंपीं गेली. तिच्या कोड्याचें तिला आयतेंच उत्तर मिळालें होतें!

वाघ आला म्हणजे झुडुपें लवतात व तो गेला म्हणजे पहिल्यासारखीं डोकीं काढतात.

तिला आपल्या प्रश्नाचें उत्तर निश्चितपणें कालच्या व्याख्यानांत मिळालें खरें, पण तें तिच्या उलट होतें! आपल्या मनासारखें उत्तर तिला कोठें मिळेल–कोण देईल? त्याला कांहींच तोड नव्हती का? रामरावांची दशा काय होईल?

'यांत तुझा दोष नाहीं' हें व्याख्यात्यांचें वाक्य तिला आठवलें. मग मी काय म्हणून त्याचे परिणाम भोगावे? हा कोठला न्याय? पण एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारावयाचें? ज्या समाजानें आपल्याला रोग दिला त्याचें उट्टें समाजावर काढावयाचें? मी तरी काय करूं? डॉक्टर म्हणतात 'तूं मार्टर होशील.' मार्टर होऊन-आत्मयज्ञ करून काय मिळणार? मार्टर होणें हें कांहीं माझें ध्येय नाहीं. संसार करणें हा बायकांचा जन्मसिद्ध हक्क आहे. माझ्यासारख्या यःकश्चित् साध्या मुलीला मार्टर व्हायला सांगणें म्हणजे भलतीच अपेक्षा करणें नाहीं काय? होणाऱ्या मार्टरहि होतील, पण मी कबूल करतें कीं, मी बोलून चालूनच अबला आहें, आणि मार्टर व्हायला तर मन खंबीर पाहिजे. बळ पाहिजे. पण त्यांनीं वर्णिलेल्या साऱ्या पातकांचें ओझें वाहण्याइतकी तरी मी बळकट आहें का? त्यांनीच माझी कंबर खचेल? नाहीं. मातृपदाचें अत्युच्च सुख अनुभविण्याकरतां सोसाव्या लागणाऱ्या अनंत असह्य यातना अबला आनंदानें सहन करतात ना? मग आम्हीं दुबळ्या कशा? पूज्य मातृपदाकरतां वाटेल तीं दुखें आम्हीं सोसूं, मुलांना मांडीवर खेळवण्याकरतां आम्हीं भयंकर हालअपेष्टा विसरूं, आणि त्यांनीं सांगितल्याच्या हजारपट तसल्या पातकांचें ओझें उचलूं. पतीच्या सुखाकरतां, मुलांच्या सुखाकरतां आम्ही हवें तें दिव्य करून दाखवूं. देशाकरतां समरांगणावर हातावर शीर घेऊन लढूं. झांशीच्या लक्ष्मीबाईनीं केलें नाहीं काय? सीतेनें अग्निदिव्य केलें नाहीं काय? आमच्या साध्वी, सती जात नव्हत्या काय? आमच्यांत हवें तेवढें तेजो-बल आहे. पोटच्या गोळ्याकरतां आम्हीं वाटेल तें करूं, पण मुलेंच नाहींत तर सारें करायचें कशाकरतां? दुसऱ्या कोणत्याहि कार्याकरतां आम्हीं प्राणांची

आहुति देऊं. प्रेमसंन्यास करूं. पण मुलें होऊं नयेत म्हणून मात्र आम्हीं मार्टर व्हायला मुळींच धजणार नाहीं–अहाहा! दिव्य मातृपदाची सर कशाला येणार? लग्नाशिवाय बायकांना गति नाहीं आणि मुलांशिवाय परिपूर्णता नाहीं. पुत्रप्राप्तीखेरीज स्वर्ग नाहीं. नका–कोणीहि माझ्या या पतिप्रेमाच्या, मातृपदाच्या, स्वर्गसाधनाच्या आड येऊं नका. मी आपली एक सामान्य मुलगी आहें. मी मार्टर नाहीं!!!

"हा काय माझा दोष?" हाच विचार आतां तिच्या मनांत डांचत होता. थोडेंसें तरी तिच्या बाजूचें बोलणारा, निदान सहानुभूति दाखविणारा मनुष्य तिला हवा होता.

डॉक्टर रामराव पुढल्या बोटीला निघणार होते.

सहानुभूति दाखविणारा डॉक्टर मिळणें शक्य नाहीं असें तिला वाटले. म्हणून ती ओळखीच्या डॉक्टरणीकडे गेली. डॉक्टरीणबाई पडद्याच्या आंत कोणाशीं बोलत होत्या. नर्स बाहेर बसली होती. पण आंतील संवाद तिला ऐकूं येत होता.

"...जपलं पाहिजे. बाळंतपण कठीण तर होणारच—" (हा डॉक्टरीणबाईचा आवाज होता.)

"कां–कां बरं—" (दुसऱ्या आवाजांत ऐकूं आलें.)

"असं सांगितलं आहे कीं, क्षयाची भावना झालेल्या मुलीनं लग्न केलं तर तिची सुटका पहिल्या खेपेस नीट होईल, दुसऱ्या खेपेस कष्टसाध्य आणि तिसऱ्यांदा–कधींच नाहीं! ती कायमचीच सुटेल."

इतकें ऐकल्यावर तेथें आडून ऐकण्याची सोय नव्हती. तिला जबरदस्त धक्का बसला. भर्कन उठून ती तेथून कांहींतरी सबब सांगून बाहेर पडली.

स्त्रीजातींत देखील कोणी तिला सहानुभूतिपर उपदेश करील असें दिसलें नाहीं.

मिनिटांमागून मिनिटें–तासामागून तास गेले. परत नर्सेसच्या वसतिगृहांत ती गेली. जेवावयाची घंटा झाली. तिला तें कोरडें घटामय जीवन नकोसें झालें. तेथून ती गांवांत एका घरंदाज मैत्रिणीकडे गेली. ज्या घरांत माणसें आहेत, मुलेंबाळें आहेत, हव्यकव्य आहे, ज्या घराला घर म्हणतां येईल अशा

ठिकाणींच तिचें मन रमलें असतें. तिला गृहिणी-माता व्हावयाचें होतें. मार्टर व्हावयाची तिची पात्रता नव्हती-तिला बळ नव्हतें, तिची इच्छा नव्हती.

* * * *

दिवसांमागून दिवस गेले तरी ठाम निश्चय होईना. तिला आतां ताप येत नव्हता किंवा खोकलाहि सांगण्यासारखा नव्हता. पहिल्यापेक्षां कांकणभर एकंदर प्रकृति बरीच दिसत होती.

डॉक्टर रामराव विलायतेहून परतले होते. येण्यापूर्वीच त्यांनीं एक नोकरी धरून ठेविली होती. क्षयरोगाश्रमाचे ते मुख्य डॉक्टर म्हणून घाटावरील एका संस्थेंत गेले. सीताबाईशीं ( त्यांच्या समजाप्रमाणें ) लग्न ठरलेलें असल्यामुळें तिला अतःपर ( लग्न लागेपर्यंत ) बरोबर नेणें प्रशस्त नव्हतें. नाहीं तर ते खास घेऊन जावयाचे.

सीताबाईच्या आतेआजानें रामराव कामावर रुजू होतांच त्यांच्याशीं परस्पर पत्रव्यवहार करून लग्नाची तिथि वगैरे निश्चित केली, व सीताबाईस मुंबईस कळविलें.

सीताबाईस काय झालें असेल तें असो. ती बाहेर फिरेनाशी झाली. लोक म्हणाले, आतां लग्न ठरल्यामुळें ती लाजते. तिला आतां पहिल्यासारखें वागणें जड जातें.

एकांतांत ती रडली. ‘ माता कीं मार्टर ’? कांहींच उत्तर येईना. हा काय माझा दोष? एवढीच तिला समाधानाला जागा होती. मनुष्याच्या मनांतील उपजत विकार, संसाराचा मोह, वात्सल्य, याला दोष द्या. ज्या देवानें क्षय उत्पन्न केला त्यानेंच हे विकार पण उपजत दिले. त्याचा काय उद्देश होता कोणास ठाऊक? देवाला दोष द्या. नर्स ही त्याच्या नाटकांतील एक बाहुली आहे. तो तिला जसें नाचवील तशी ती नाचणार.

रामराव व सीताबाई यांचें लग्न लागलें खरें, पण अखेर मातृपदापर्यंत ती पोहोंचली कीं नाहीं कोण जाणे! कारण, तिच्या प्रकृतीकरतां म्हणून तीं दोघेहि खानदेशांत कोठल्याशा ठिकाणीं कोरड्या हवेंत राहाण्यासाठीं म्हणून गेलीं, पण पुढें त्यांची कांहींच हकीगत समजली नाहीं!

* * * *

ती मार्टरहि झाली नाहीं व माताहि झाली नाहीं!!!

---

# वेडी काशी



सुरल्या हिंवाळ्यांतील एका पहांटेस काशीनाथ अलहाबादच्या स्टेशनवरून कॅनिंग टाऊनकडे एक्क्यांतून निघाला व एका बंगल्याच्या फाटकापाशीं उतरला. हा बंगला खरोखरच एकाद्या कादंबरींतील बंगल्याप्रमाणें होता इतकें म्हटलें असतां अधिक वर्णन देण्याची जरुरी नाहीं. त्याचप्रमाणें काशीनाथ हा आमच्या कथानकाचा नायक आहे इतकेंच सांगून त्याचें समग्र वर्णन देण्याचें वाचवितों.

काशीनाथाची वृत्ति एकाद्या मुलाप्रमाणें आनंदी व खेळकर झाली होती. कॉलेजची परीक्षा संपवून तो प्रवासाला निघाला होता. त्याचे पेपर चांगले गेले होते व यंदा त्याच्या दोन हाताचे चार हात होणार होते. अलहाबादेस आपल्या मित्राकडे–मधुकराकडे तो उतरणार होता, व दिल्ली, आग्रा, काशी वगैरे स्थळें पहाण्याचा त्याचा बेत होता.

मधुकराला दोन बहिणी होत्या हें काशीनाथाला माहीत होतें. परंतु त्या केवढ्या आहेत, काय आहेत, त्यांपैकीं एकादीचें लग्न झालें आहे कीं काय, याची त्याला नीट माहिती नव्हती. तरी त्या मुली दृष्टीस पडतील हा एक हेतू काशीनाथाच्या प्रवासाच्या मुळाशीं मुळींच नव्हता असें म्हणतां येईल कीं नाहीं कोण जाणें! तेवढ्याकरतांच तो इतक्या लांबच्या प्रवासाला निघाला होता असें मात्र खास नव्हे. त्या मुलींपैकींच कदाचित् एकादी आपली बायको होईल असा विचार त्याच्या मनांत येऊनहि गेला असेल. कादंबरींतील अल्लड तरुणच तो! वाटेल ते स्वप्नमय, सुखकर व शेख महंमदी विचार त्याच्या मनांत येत जात होते. आगगाडींत बरीच रात्रपर्यंत असे स्वप्नमय विचारच घोळत होते. प्रवासाच्या दगदगीनें जरी त्याचा चेहेरा श्रमलेला दिसला तरी त्याचें अंतःकरण या वेळीं प्रफुल्ल होतें.

आपली हँडबॅग हातांत घेऊन व फाटकाची कडी आंतून काढून तो बंगल्यापुढील आवारांतील 'आंत' जाण्याच्या रस्त्यानें कोणी दिसतें कीं काय म्हणून

इकडे तिकडे पहात निघाला व पोर्चपर्यंत गेला, तरी त्याला कोणीं दिसलें नाहीं. पोर्चमधील दारांत जाऊन तो दारावर टिचकी वाजविणार तोंच त्याच्या पायाशीं अजगराप्रमाणें पडलेला एक मोठा केंसाळ काळा कुत्रा निजल्या-निजल्याच गुरगुरूं लागला. दचकून काशीनाथ मागें सरला. वेळ पहांटची, अनोळखी ठिकाण आणि आसपास मनुष्य कोणीं नाहीं अशा स्थितींत पुढें दारावर टिचकी वाजविण्यास त्याचें धैर्य होईना. पण जरा मागें सरकून 'मधू-मधू' अशी त्यानें हांक मारली. पण कुत्र्याखेरीज कोणालाच ती हांक ऐकूं गेली नसावी. कुत्रें मात्र जरा अधिकच गुरकावूं लागलें. कुत्र्याच्या हालचालीवर एक डोळा ठेवून काशीनाथ पोर्चमधून बाहेर पडला, व बंगल्याच्या बाजू-बाजूनें मागीलदाराकडे चालला. बंगल्याभोंवतीं बाग होती व या ठिकाणीं एक कामठ्याच्या चौकटीचें नवलाईचें दार असून त्यावर 'खाजगी' अशी इंग्रजींत पाटी होती. पण अंधेरामुळें व तिच्यावर वेलींचीं पानें पसरल्यामुळें ती काशीनाथाला दिसली नाहीं. हें दार उघडून मागीलदारीं जावें, कीं पुनः परत पुढल्या दरवाजाशीं येऊन पुनः हांका माराव्या या विचारांत तो होता.

यावेळीं साधारण दिसूं लागलें होतें. लांबून जात्यावरील बारीक व कर्कश गाणें ऐकूं येत होतें. गंगेवरील पुलावरून जाणाऱ्या आगगाडीचा पोकळ आवाज अस्फुट घुमत होता. बागेंत दोनचार ठिकाणीं पांढरे संगमरवरी पुतळे उभे केलेले पुसट दिसत असून त्यांच्या अंगावरून दंवकण ओघळत होते.

शेवटीं तें कामठ्याचें दारच उघडावयाचें त्यानें ठरविलें, कारण, तिकडे त्याला कांहीं चाहूल लागली. दार खरडत त्यानें उघडलें. आंत हातांत परडी घेतलेल्या एका बाईचा मनोहर पुतळा एका कारंजाशेजारीं उभा केलेला त्याला दिसला, व त्याच्याच शेजारीं दुसऱ्या एका फुलाची परडी घेतलेल्या बाईचा पुतळा—

नाहीं. हा दुसरा पुतळा नव्हता. ही हलती-चालती पुतळी होती. एक अत्यंत लावण्यवती तरुण कुमारी होती. इतकें सुंदर रूप, असा गोंडस बांधा काशीनाथानें आजन्मांत केव्हांहि पाहिला नव्हता. दाराचा आवाज होतांच किंचित् वांकडी मान करून तिनें वर पाहिलें होतें. दोन दृष्टींचें मीलन झालें. पहांटेच्या त्या अंधुक प्रकाशांत त्याला अधिक दिसत नव्हतें व साहजिकच तें पहावयास तो फार वेळ थांबलाहि नाहीं. दार अर्धवट तसेंच उघडें टाकून तो मागें फिरला.

त्या अंधुक प्रकाशांत तिचें सर्व सौंदर्य दिसत नव्हतें, तरी ती अप्रतिम रूपवान् आहे हें सहज समजत होतें.

हीच तरुणी आमच्या गोष्टीची नायिका असल्यामुळें तिचेंहि अधिक वर्णन करण्याची जरूरी नव्हती पण कादंबरींतील नायिकेच्या स्वरूपालाहि लाजवील इतकी ही सुंदर होती. विपुल केंसांखालीं तिच्या गोऱ्या कानांचा वरचा अर्धा-अधिक भाग अर्धवट झांकला गेला होता. पवित्र शास्त्राज्ञेला गुंडाळून ठेवणाऱ्या रूढीप्रमाणेंच ते कान त्या केसांमुळें लुप्तप्राय झाले होते. त्या रूढीच्या कचाट्यांत सांपडलेल्या संसारी मनुष्याप्रमाणें पाहाणाऱ्याचें मन त्या केशकलापांत गुरफटून जाई. भांग मध्यावर पण रेंखीव नव्हता. त्याला कोठूनच तरी आरंभ होऊन तो वेडावांकडा मागेंपर्यंत गेला होता, व मधुनच इकडल्या बटी तिकडे गेल्यामुळें तो गुप्त झाल्यासारखा दिसे. यामुळें मधुनमधून दाट झाडी असल्यामुळें दिसेनाशा होणाऱ्या एकाद्या नागमोडी झऱ्याप्रमाणें तो भांग शोभत होता. मागें दुभंगल्यामुळें तर गंगायमुनांच्या संगमाचीच आठवण झाली असती. ह्या गंगेचा प्रवाह नंतर समुद्राप्रमाणें विशाल अशा तिच्या कपाळावर जाऊन मिळाला होता. साधारण अर्धवर्तुळाकृति अशी केंसांची एक कमानच कपाळावर दिसल्यामुळें त्या कपाळाला एकाद्या सुंदर बंदराची उपमा शोभली असती. कपाळावरील कुंकू लांबून दिसणाऱ्या समुद्रांतील तांबड्या 'लाइफ बॉय' प्रमाणें वाटे.

तिचे काळे कुळकुळीत डोळे तिच्या मुखसमुद्रावर लांबून दिसणाऱ्या दोन जहाजाप्रमाणेंच वाटत व धुक्यामुळें दबलेल्या धुराची तिच्या भिंवयांना उपमा शोभली असती. एकाद्या दीपगृहांतील दिव्याप्रमाणें तिच्या नाकांतील मुगबट चमके, अगर एकाद्या टेकडीवरील पिकेटच्या एकुलत्या एका संत्र्याच्या 'बागनेटा'प्रमाणें मधुनच लखलख करी. तिच्या हाताचीं बोटें इतकीं नाजुक होतीं कीं, तिनें हातांत फूल धरलें तर तें कोमेजण्याऐवजीं हातच चुरगळला जाईल कीं काय असें पहाणारास वाटावें. अंगावर दागिने नव्हते हें एकपरी बरेंच होतें- कारण दागिन्यामुळें तिची शोभा वाढण्याऐवजीं तिचें नैसर्गिक सौंदर्य मात्र दृष्टीआड झालें असतें. फुलासारखें असें नाजुक शरीर तोलायला मोठ्या पावलांची आवश्यकता नव्हती म्हणूनच कीं काय, तिचीं पावलें चिमुकलींच होतीं व तीहि जरा मोठी झाली या भीतीनें देवानें त्याच्याखालीं बांकदार कमानी कोरल्या होत्या.

ती पांढरें पातळ नेसली होती. त्याच्यावर पुष्कळशा सुरकुत्या असून तेंच पातळ नेसून ती निजलेली असल्यामुळें आपोआपच चापून-चोपून नेसल्या-सारखें तें दिसत होतें. पदर सगळा पाठीवर गळाला होता व ती खालीं वांकली म्हणजे तर हातावरहि घसरून येई. पण मग ती तो पुनः पहिल्यापासून उजवा हात लांब करून नीट घेई.

ती ज्या संगमरवरी पुतळ्याशेजारीं उभी होती तो अत्यंत सुबक आणि नयनमनोहर तर होताच, पण अशी कल्पना येई कीं, या बाईची मोहक व प्रमाणबद्ध आकृति पाहूनच कीं काय, तो पांढरा संगमरवरी पुतळा खजील होऊन असा पांढराफेक पडला आहे व लज्जेनें त्यानें आपली मान किंचित् खालीं घातली आहे.

सूर्य, चंद्र, हे एक-एकटेच असल्यामुळें तेच आपल्याला चांगले वाटतात, कारण, त्यांच्याशीं स्पर्धा करायलाच दुसरे चंद्र-सूर्य नाहींत. पण असंख्य ताऱ्यांत शुक्राची चांदणी चमकावी तशी हजारों तरुणींत ही मुलगी रूपसुंदर होती. हिच्याइतकी सुंदर स्त्री बृहन्महाराष्ट्रांत नव्हती म्हटलें तरी चालेल !

* * * *

मधुकर व त्याचा पाहुणा काशीनाथ चहा घ्यावयास बसले. नेहमींच्या संवयीप्रमाणें मधूनें सुंदरला हांक मारली-कारण आज पाहुणे असल्यामुळें ती आंत आली नव्हती. कामत्याच्या दारामागें पाहिलेली मुलगी म्हणजेच सुंदर कीं तिची बहीण ! काशीनाथ उत्कंठतेनें पाहूं लागला. कां तिसरीच कोणी ?

सुंदर आंत आली. पहांटे पाहिलेली मुलगी ती ही नव्हे. काशीनाथाची त्या दृष्टीनें थोडीशी निराशाच झाली !

सुंदरनें आपण होऊन काशीनाथाशीं प्रथम बोलणें शक्य नव्हतें व दोघानांहि प्रथम संकोच वाटत होता. पण अशा प्रसंगीं आपण थोडें तरी सुंदरशीं बोललें पाहिजे-नाहीं तर वाईट दिसेल, या उद्देशानें काशीनाथानें विचारलें, "तुमच्या बहिणीला नाहीं का चहा घ्यावयाचा ?"

"ती नाहीं चहा घेत," सुंदर म्हणाली.

चहा पिणें झाल्यावर काशीनाथ दिवाणखान्यांत लावलेलीं चित्रें पाहूं लागला. त्यांत फोटो होते. लोंकरीच्या व रेशमाच्या तसबिरी होत्या व रंगीत देखा-व्यांचीं चित्रेंहि होतीं. यापैकीं कांहीं चित्रें लांबून छापील दिसत होतीं पण

जवळ जाऊन पहातां तीं हातानेंच काढलेलीं आहेत हें ओळखूं येत होतें. कित्येकांच्या खालीं 'काशी' असें लिहिलेलें होतें.

"हीं तुमच्या बहिणीनें काढलीं वाटतं?" काशीनाथानें विचारलें.

"होय." मधु म्हणाला. "तिला चित्रांचा फार नाद आहे. सारखी हातांत ब्रश घेऊन बसलेली असते."

वस्त्रें नेसवलेल्या दमयंतीचें चित्र फारच खुलून दिसत होतें. तसेंच 'चंद्रिका' असें एक रंगी चित्र अत्यंत नैसर्गिक वठलें होतें.

जेवायच्या वेळीं सर्वजण बरोबरच बसले, पण काशी मात्र नव्हती.

"ती आहे वेडपट" मधू म्हणाला, "सारखं कांहीं तरी करीत बसलेली असते. बसली असेल एकादी कादंबरी लिहीत. मग तिला जेवणखाण कांहीं नको. एक धरून बसली कीं मग तेंच. मध्यें त्या चित्रांचच खूळ लागलं होतं. आतां हें प्रेमकहाण्या लिहिण्याचं."

"मग काय वाईट त्यांत?" काशीनाथानें विचारलें, "मी तर म्हणतों हें चांगलंच आहे. बाकी वीणकाम, चित्र-लेखन यांचं वेड मात्र खरं!"

"अरे वेड काय! ती शुद्ध सात-वेडी आहे! लेख ल्याहावे, चित्रं काढावी-मी नाहीं म्हणत नाहीं. पण हें काय?-कधीं वेळच्या वेळीं जेवायचं नाहीं-चार माणसांत येऊन बसायचं नाहीं-आपली एकटी बसलेली असते सदा न् कदा! आम्हीं तिच्या खोलींत गेलेलं सुद्धां खपत नाहीं मग तिला."

तिसरे प्रहरीं पत्त्याचा डाव निघाला. मधु, सुंदर, काशी व आपण हे चौघे भिडू होणार असें साहजिकच काशीनाथाला वाटलें. पण पत्त्यालाहि काशी नव्हती.

"बसली असेल एकादा 'सूर्यास्त' रंगवीत!" मधू म्हणाला.

काशीनाथाची सारखी निराशाच होत गेली! संध्याकाळीं फिरायला, रात्रीं जेवायला, भोजनोत्तर ग्रामोफोन ऐकायला काशी नव्हती!

एक-दोन-तीन-चार दिवस गेले. काशी कांहीं पुन्हां काशीनाथाला दिसली नाहीं. ती एकटीच मोटरमधून केव्हां तरी भुर्कन फिरायला निघून जाई, व बाकीचा वेळ ती आपल्या खोलींत दडी मारून बसे!

काशीनाथाचा जायचा दिवस येऊन ठेपला. पहांटे आपण चोरून बागेंत पाहिलें तर? तो मोठ्या पहांटेस उठला व आपल्या खिडकींतून पाहूं लागला.

पण . बागेंत–चौकटीच्या दरवाजाजवळ, संगमरवरी पुतळ्याजवळ–कोणींहि नव्हतें. काशीच्या खोलींत दिवा दिसत होता. आज फार थंडी होती म्हणून ती फुलें तोडायला आली नसेल.

जड अंतःकरणानें काशीनाथ निघाला.

*　　　*　　　*

काशीनाथाला लवकरच कळून चुकलें कीं, आपण प्रेमपाशांत पुरें सांपडलों आहों ! अलहाबादेचे ते चार दिवस त्याला वारंवार आठवूं लागले. साऱ्या आयुष्यांत ते चार दिवस संस्मरणीय झाले. असे सुखाचे व त्याचवेळीं निराशेचे दिवस त्यानें पूर्वीं केंव्हांहि अनुभविले नव्हते. निराशा अनुभविण्याकरतां कां होईना पण तसे दिवस पुन्हां येतील काय ? इतकी सुसंस्कृत इतकी कसबी बायको मिळण्याइतकें आपलें भाग्य असेल का ? वाचन, लेखन चित्रकला आणि नक्षीकाम–सर्वच काशीनाथाच्या आवडीचें. काशी अर्थात शाळेंत शिकत नव्हती. सुंदर कॉलेजांत जात असे. पण त्याला असें कळलें कीं काशीला कॉलेजांतील शिक्षण पसंत नव्हतें. आपल्या आवडीप्रमाणें आपल्या आवडत्या विषयांचा अभ्यास तिनें घरींच चालविला होता. युनिव्हर्सिटीच्या शिक्क्याची तिला पर्वा नव्हती. सुंदर व्यवहारी असून तिची लौकिकदृष्टि होती. दोघींहि आपल्यापरीनें रोमँटिक होत्या. पण काशीला विवाह करावयाचा नव्हता. आपल्या आवडत्या कार्याला आजन्म तिनें वाहून घेतलें होतें. संसाराचा पाश तिला नको होता. सुंदरची कल्पना तशी नव्हती. योग्य वेळीं योग्य वराशीं लग्न होऊन आपण ऐटींत संसार थाटावा, चार लोकांत आपली वाहवा असावी अशी सुंदरची आकांक्षा होती.

काशीनाथाला करमेनासें झालें. ध्यानीं मनीं स्वप्नीं त्याला काशी दिसावी. काशी ही थोरली बहीण होती. त्या मुलींचें लग्नाचें ठरलें म्हणजे अर्थात् काशीचेंच अगोदर व्हावयाचें. मागें कॉलेजांत गप्पा मारतांना थट्टेनें काशीनाथाच्या लग्नाबद्दल मधूनें गोष्टहि काढली होती. पण तेव्हां कशास कांहीं ठिकाण नव्हता. आपलें मनोगत कोणाला तरी सांगावें असें काशीनाथाला राहून राहून वाटे. पण सांगणार कोणाला ? मधूलाच विचारलें तर ?

धीर करून त्यानें एक लांबलचक पत्र लिहिलें. पण त्याचें उत्तर आलें कीं काशीला लग्न कर्तव्य नाहीं. ती अविवाहित राहण्याचा हट्ट घेऊन बसली आहे.

आम्हीं आजपर्यंत अनेक वेळ तिची समजूत घातली पण ती एकदां घेऊन बसली आहे तें खरें. तिच्यापुढें आमचें कांहींच चालत नाहीं !

अद्याप काशीचें मन बदलेल अशी काशीनाथाला आशा होती व मध्यंतरी जरी तो भिडेनें व नाइलाजानें सांगून आलेल्या मुली पाही तरी कोणालाच तो हो म्हणेना. त्याच्या वागणुकीचा कोणालाच उमज पडेना. चांगल्या चांगल्या मुली तो परतवूं लागला.

काशीनाथाचें व त्याच्या मामाचें बरेंच सूत होतें. मामा परगांवीं रहात. तेव्हां मामांकडून कांहीं सांगून पहावें म्हणून काशीनाथाच्या आईनें आपल्या भावास पत्र लिहिलें. नंतर पत्रद्वारें मामानें काशीनाथास विचारलें कीं ही काय भानगड आहे ? श्रीमंतांच्या शिकलेल्या देखण्या मुलींना तूं नाकें मुरडतोस व वेड्यावेड्यासारखें करतोस तर तुझें अगोदरच कोणावर प्रेम–बीम तर गेलें नाहीं ? तसें असलें तर तसें सांग म्हणजे पाहूं काय करायचें तें.

आपलें हृद्गत ओकायला ही चांगली संधि होती. व काशीनाथानें आपल्या प्रेमकहाणीचें एक अत्यंत हृदयंगम पत्र मामांना लिहिलें.

मामाचें पुढीलप्रमाणें पत्र आलें. " वा ! एकंदरींत आपण प्रेमपाशांत सांपडलात तर ! पण पहा बरं ! संभाळ. दानाप्रमाणेंच प्रेमालाहि सत्पात्र पाहिजे ! तुमच्यासारख्या अल्लड तरुणांची मनं असतात उच्छृंखल. नाटकें वाचून आणि सिनेमा पाहून रोमँटिक झालेलीं ! अरे बाबा, असें का कुठें प्रेम जडत असतें ? जो उठला तो लागला प्रेम करायला. काय म्हणे एकजण दुसऱ्याच्या घरीं जातो, तेथें एक पोरगी पहातो आणि धाड्दिशीं प्रेमपाशांत पडतो ! ही का प्रेमाची रीत ? कित्येक दिवस एकमेकांचा सहवास घडला पाहिजे, स्वभाव कळले पाहिजेत. सर्व पायरी पायरीनेंच झालें पाहिजे. तुम्ही तरुण म्हणजे असतां भुकेले दुष्काळांतून आल्यासारखे. आपल्यांत म्हण आहे ना भुकेला कोंडा आणि निजायला धोंडा तेव्हां तुमच्यासारख्या आशाळभूतांना कांहीं वाढून आलें तरी त्याला तुम्हीं हपापलेलेच असता ! म्हणजे मी असें म्हणत नाहीं कीं ती मुलगी योग्य नाहीं. पण एक गोष्ट सांगितली. काशीनाथ, मीहि पण या तालमींत कांहीं दिवस काढले आहेत. माझें असें म्हणणें नाहीं कीं तुमच्या मनांत खरें प्रेम नसतां, आहे असें दाखवून तुम्हांला कोणाला फसवायचें असतें. छेः ! तुम्हांला

मनापासून खरेंखुरेंच वाटतें कीं आपलें प्रेम अमुक ठिकाणीं जडलें आहे. पण ही वस्तुस्थिति मात्र नसते. ज्यां दुसरी मुलगी पाहिली कीं तिच्यावरहि तुमचें प्रेम जडेल! या वयांत प्रेम करायला तुम्हांला कोणी तरी हवें असतें, इतकेंच. एकाद्या वेड्याला मनापासून वाटतें कीं आपणच गव्हर्नर आहोंत, आपल्या पायाला केव्हां केव्हां मुंग्या येतात. कावीळ झालेल्या मनुष्याला सर्व वस्तु खऱ्याच पिंवळ्या दिसतात. पण तो वेडा, गव्हर्नर असतो का? पायाला खऱ्याच मुंग्या आलेल्या असतात का? त्या वस्तू वास्तविक पिंवळ्या असतात का? नाहीं. तुम्ही तरुण त्या वेड्यासारखे, त्या मुंग्या आलेल्या मनुष्यासारखे, त्या कावळी झालेल्या रोग्यासारखे असता........"

काशीनाथानें पुढील उत्तर लिहिलें: "......लोक त्याला प्रथमदर्शनीं प्रेम म्हणोत अगर स्वार्थी प्रेम म्हणोत. पण तूं कांहीं लोक नाहींस. मी शपथपूर्वक सांगतों कीं, तसल्या स्वार्थी प्रेमाचा मला विटाळहि झाला नाहीं. तूं म्हणतोस तें खरें असेल, पण मी कांहीं इतरांच्यासारखा नाहीं. इतरांच्या बाबतींत कदाचित् त्याला 'प्रेम' हें नांव देणेंच चूक असेल. त्यांच्या विकाराला प्रेम हें नांव देणें म्हणजे त्या पवित्र नांवाची विटंबना करणेंच होय. कसेंहि असो, पुनः एकदां मधुकराला विचारावें असें मला वाटतें. 'माझ्या वतीनें एकवार खुद्द बहिणीलाच विचार. माझे विचार तिला सांग' असें मधूला लिहावें. कारण एकदां जिकडे मन धांवलें तिकडून तें माघारीं आणणें शक्य नाहीं. राग आणि लोभ हे परस्पराहून जितके भिन्न आहेत तितकेच प्रेम आणि विकार हे निराळे आहेत. राग कोणावरहि काढला तरी तो शमतो. पण अमुक एकाद्यावर लोभ जडला असला तर त्या मनुष्याऐवजीं बदली चालायचा नाहीं..........."

फिरून मामानें लिहिलें. "—परिचयानंतरहि जें टिकेल तेंच प्रेम. साध्या ओळखीचें असेंच नाहीं का? प्रथम आपले दोष कोणी दाखवीत नसतो, प्रथम तो गोड शब्दच बोलतो. व आपला त्याबद्दल चांगला ग्रह होतो. परिचयानें त्याच्या स्वभावांतील उणीवा हळुहळू आपल्याला कळूं लागतात, व मग आपण त्याला टाळूं लागतों. एकाद्या अशा मुलीशीं लग्न झालें म्हणजे मग आपल्या दोषांवर पांघरूण घालण्याची काळजी ती घेत नाहीं, आपल्या उणीवा भरून काढण्याची ती पर्वा करीत नाहीं. अशा रीतीनें तिचें खरें स्वरूप प्रकट झालें म्हणजे मग पश्चात्तापाची पाळी येते...."

त्यावर काशीनाथानें उत्तर लिहिलें:—"खरें प्रेम परिचयानंतरहि–मग तो किती का दुःखद असेना–कायम टिकेल. कोणत्या का कारणानें असेना,–स्वरूपाला भुलून असो किंवा गुणावर लुब्ध होऊन असो–एकदां खरें प्रेम जडलें म्हणजे तें उडणें शक्य नाहीं. उलट सान्निध्यानें वाढतच जाईल.—"

शेवटीं मामांनीं निक्षून लिहिलें कीं, कसेंहि असलें तरी त्या मुलीला जर लग्नच करावयाचें नाहीं तर तिचा नाद धरण्यांत काय अर्थ आहे? तेव्हां झाली गोष्ट झाली नाहीं असें समजून, पुढील कार्यास लागणें शहाणपणाचें आहे.

पण काशीनाथाचें चित्त अजून स्वस्थ होईना. अद्याप त्याला आशा होती. पुष्कळ मुली अविवाहित राहण्याचा निश्चय करतात पण शेवटीं त्यांचा तो निश्चय कांहीं ना कांहीं कारणानें ढासळतोच. शिवाय, त्याला अशीहि शंका आली कीं मधुकराच्या मनांत काशी आपल्याला द्यावयाची नसेल, म्हणूनच त्यानें कांहीं तरी थाप दिली नसेल कशावरून? त्यांतील खरें समजायला मार्ग काय? पण काशीनाथ अलाहाबादेस होता तेव्हांच त्याला समजलें होतें कीं, काशी लग्न करणार नाहीं. काशीच्या नादानें काशीनाथ इतका वेडा झाला कीं, त्याला कार्यकारणभावच नीट समजेनासा झाला. त्याचें तर्कज्ञान बिघडलें. दुसऱ्या मुली सांगून येतच होत्या. अखेर त्यानें एक शेवटचा उपाय करून पहाण्याचें ठरविलें. काशीच्याच नांवानें एक पत्र टाकावें, व खुद्द तिलाच विचारावें. यांत वावगें त्याला कांहींच दिसेना. या बाबतींतहि त्याला बऱ्याच शंकाकुशंका आल्या, पण करून फसूं या, न करून फसण्यांत अर्थ नाहीं अशी त्यानें स्वतःची समजूत केली. व काशीच्या नांवचें त्यानें एक पाकीट पाठविलें.

पत्रोत्तराची तो वाट पाहूं लागला. अपेक्षित दिवशीं डांकवाला घरीं येई-पर्यंत त्याला धीर निघेना. तो पोष्टांत गेला. पण डांकवाला अगोदरच बाहेर पडला होता. अधिकच उत्कंठेनें काशीनाथ तडक घराकडे परतला. वाटेनें तो पोस्टमन कोठें दिसतो कीं काय ते पाहूं लागला. घराजवळ आल्यावर अली-कडच्या घरांत पोस्टमन शिरतांना त्यानें पाहिला व तो बाहेर येईपर्यंत तो तेथेंच रस्त्यांत थांबला. पोस्टमन परत आल्यावर आपल्या नांवच्या पत्राची त्यानें चवकशी केली पण त्याचें पत्र नव्हतें. पोस्टमन पुढें चालूं लागला. कदाचित् गडबडींत पोस्टमननें कांहीं तरी सांगितलें असेल अशी काशीनाथाला आशा वाटली व अजूनहि पोस्टमन आपल्या घरांत शिरून आपलें पत्र टाकील

असें त्यास वाटलें. पण नाहीं. आपलें घर टाकून पोस्टमन पुढें चालता झाला !

त्याला वाटलें पुढच्या डांकेला येईल. म्हणून तो बराच आधीं पोस्टांत गेला. पण याहि डांकेला त्याचें पत्र नव्हतें. नाना तर्कवितर्क त्याच्या मनांत चालत. एक-दोन-तीन-चार दिवस गेले तरी पत्र येईना. आतां मात्र त्याची निराशा झाली. तरी तो अत्यंत उत्कंठेनें डांकेची वाट पाही. कदाचित् एकदम होकाराची तार येईल असेंहि त्याच्या वेड्या मनांत येई. पण तार नाहीं पत्र नाहीं.

केलें तर काशीशींच लग्न करावयाचें, नाहीं तर अविवाहित रहावयाचें अशी त्यानें मनाशींच पक्की खूणगांठ बांधून ठेवली, व त्यामुळें त्या दुःखांत त्याला जरा बरें वाटूं लागलें, व त्याच्या मनाला एकप्रकारचें धैर्य वाटूं लागलें.

घरच्या मंडळींनीं त्याची परोपरीनें समजूत केली, मामांनींहि गळ घातली. पण काशीनाथ मुळींच भीक घालीना.

इतक्यांत त्याच्या ध्यानीं मनीं नसतां त्याला एक पत्र आलें. शिक्का अलाहाबादचा होता. हस्ताक्षर बाईचें होतें. आंत कांहींहि मजकूर असला—होकारार्थी किंवा नकारार्थी—तरी वेळ पडल्यास अविवाहित राहण्याचा निश्चय केला असल्यामुळें काशीनाथाला त्या पत्राची तितकीशी भीति वाटली नाहीं. पत्र आलें आहे त्या अर्थी होकारच असावा असा त्याचा साधारण तर्क झाला व तो मनांत आनंदला. फार तर कांहीं अटीवर होकार असेल इतकेंच.

पण पत्र वाचून जरी त्याची कायमची पूर्ण निराशा झाली तरी त्याच अविवाहित राहण्याच्या निश्चयामुळें त्याला एकप्रकारें आधार वाटला. पत्रांत अर्थात् नकार होता व तें खुद्द काशीच्या हातचें होतें, तिला केव्हांच कोणाशींच लग्न कर्तव्य नव्हतें.

दुसरे दिवशीं काशीनाथाला पुनः शंका आली. पत्र जरी खुद्द काशीच्या हातचें असलें तरी तें तिनें भावाच्या शिकवणीवरून लिहिलें असेल, तें तरी खरें कसें समजायचें ? तेव्हां इतका खटाटोप व्यर्थच गेला म्हणायचा !

अखेरचा उपाय थकला. घरच्या मंडळींनीं निकड लावली. मामांनीं मुद्दाम गांवाहून येऊन त्याची अनेक प्रकारांनीं समजूत घातली. तुला लग्न करावयाचंच आहे. ती मुलगी पाहिली नसतीस तर दुसरीशीं लग्न केलं असतंस कीं नाहीं. प्रेमाविषयीं म्हणशील तर तुला आवडेल अशीच मुलगी तूं कर. आम्हीं कांहीं

गलतीसलती तुझ्या गळ्यांत घालीत नाहीं. त्या मुलीला जर लग्नच करायचें नाहीं तर तूं तरी काय करणार? चार दिवसांनीं तूं तिला विसरशील. लग्नावांचून मनुष्य पूर्ण नाहीं. पक्षीदेखील जोडप्यानें राहतात. अविवाहित राहून तूं कोणता अर्थ साधणार? संन्यास तर घेणार नाहींसना? मग लग्न करून संसार करून धर्म अर्थ काम आणि मोक्ष तुला नाहीं का साधतां येणार? मनाची तेतकी तयारी झाल्याशिवाय संन्यास घेणें धोक्याचें आहे. शिवाय तूं संन्यास घेऊन अरण्यांत कांहीं जाणार नाहींस. मग ब्रह्मचारी राहून तूं कोणता दिग्विजय गाजविणार? आणि–आणि–ब्रह्मचारी राहणं इतकं सोपं नाहीं. चार वर्षांनीं तुलाच आपला वेडेपणा कळून येईल व मग लग्न करायला फार उशीर होईल. इसें होईल तें निराळेंच तेव्हां काय तो विचार ठरीव–नाहीं, तुला आतांच लग्न केलें पाहिजे. आमचें मोठ्या माणसांचे या वेळेस तूं ऐक.

पण काशीनाथाचा निर्धार झाला होता. तो कोणाचेंच ऐकेना. लग्नाच्या बाबतींत तो संन्यस्त झाला होता. त्याला वाईटहि वाटत नव्हतें व बरेंहि वाटत नव्हतें. मात्र आपल्या लग्न न करण्याच्या निश्चयामुळें त्याला एक प्रकारचें बळ आलें होतें.

अशा स्थितींत कांहीं दिवस गेले. व त्या निश्चयाच्या बळावर त्याचें मन बरेंच स्थिरस्थावर झालें. मधूनमधून पुनः कोणी लग्नाची गोष्ट काढी व तेव्हां फिरून काशीनाथाला सुचेनासें होई व तो बिथरे. पण नंतर तो पुनः शांत होई.

* * * *

" तूं अविवाहित राहून काय करणार? तिला जर लग्नच कर्तव्य नाहीं तर उगाच तिच्या नादीं लागण्यांत काय अर्थ आहे? तूं संन्यास तर घेणार नाहींस ना? लवकरच तूं तिला विसरशील."

खरेंच, मी अविवाहित राहून काय करणार? ब्रह्मचर्य सोपें नाहीं. पण मला माझ्याबद्दल पूर्ण खात्री व आत्मविश्वास आहे. लग्न करून नाहीं का देशसेवा करतां येत. लग्नावांचून मनुष्य पूर्ण नाहीं. पक्षी पण जोडप्यानें राहतात. मला हें सर्व समजतें. पण करूं काय? लग्नाकडे माझें मन घेतच नाहीं. लग्न म्हणजे मला मोठा गुन्हा वाटूं लागला आहे. अविवाहित राहून देशसेवेचं व्रत मला आतांच कां सुचलं? पूर्वीं मी लग्नाला खुषी होतो ना?

तेव्हां देखील देशसेवा करावयाची माझी महत्त्वाकांक्षा होतीच ना ? मग आतांच अविवाहित राहून का ? केवळ एक मुलगी नाहीं म्हणाली म्हणून ?– नाहीं तरी कोठें म्हणाली ? तिला लग्नच कर्तव्य नाहीं. मग एका मुलीला लग्न कर्तव्य नाहीं म्हणून मीहि अविवाहित राह्यचं ? माझीं पूर्वीची सुखस्वप्नं आपल्या हातानं नाहींशी करायची ? आपण कल्पिलेल्या संसारचित्रावर काजळी फासायची ? माझी चूक असती तर मी कोणतेंहि खडतर व्रत स्वीकारलं असतं. पण तिला लग्न करावयाचें नाहीं हा का माझा दोष ? मामा म्हणाला 'तूं तिला लवकरच विसरशील.'

नाहीं. मामा, तुझें बाकीचें सर्व म्हणणें खरें असेल पण मी तिला विसरेन असें तुला वाटत असेल तर मात्र तूं सपशेल घसरलास. मी तिला विसरणें शक्य नाहीं. कालत्रयीं नाहीं.

अशा तऱ्हेचे विचार आले कीं पुनः काशीनाथाची वृत्ति चळे पण मग शेवटीं आपल्या आत्मविश्वासावर अवलंबून तो तो विचार घालवून देई व आजन्म अविवाहित राह्यचें असें शेवटीं ठरविलें म्हणजे त्याचें ओझें हलके होई व मन निवळे. 'मी कांहीं लेचापेचा नाहीं. माझी खात्री आहे कीं मी निष्कलंक राहीन,' असें तो स्वतःशीं म्हणे.

मधुकरानें किंवा काशीनें खोटेंच लिहिलें असलें तरी काय ? आपल्याला जर काशी द्यायचीच नसेल तर ? काशीलाच जर आपण नको असलो तर ? यदाकदाचित् तिचा बेत ढासळला तरी आपल्यावर जर तिचें प्रेमच नसलें तर ती आपल्याला कशी कबूल होईल ? अशा प्रकारें रात्रंदिवस कांहींना कांही भवति न भवति काशीनाथाच्या मनांत व्हावी व पुनः झाली गोष्ट तितक्यावर सोडून ' नाहींच लग्न करायचें' असें तो ठरवी.

घरच्या मंडळींचें टुमणें त्याच्यामागें होतेंच. मामांनीं लकडा लावलाच होता.

आजन्म अविवाहित रहावें, करावयाचें तर काशीशींच लग्न करावयाचें-- असें मला आज वाटत आहे खरें–अगदीं मनापासून खात्रीपूर्वक वाटत आहे. पण हा माझा वेडेपणा नसेल ना ? माझी पक्की खात्री आहे कीं देहांत जीव आहे तोंपर्यंत मी तिला विसरणार नाहीं. पण हाहि माझा भ्रम, वेडेपणा ठरेल का ? असें किती तरी तरुणांच्या बाबतींत होत असेल. पण पुढें ते विसरून

जातात. स्वतः मला जरी आत्मविश्वास आहे तरी तो खरा आहे ना ? आत्तां मला जरी तसें वाटत नसलें तरी तें भावनेच्या तीव्रतेमुळें-तरुणपणच्या हट्टीपणामुळें किंवा कशाहिमुळें असेल. आणि पुढें मला कदाचित् पश्चात्ताप होईल. प्रत्येकाला स्वतःबद्दल आत्मविश्वास असतो. मी कांहीं इतरांच्यासारखा दुबळा नाहीं अशीच प्रत्येकाला घमेंड असते. मामा म्हणतो त्यांत कांहींच अर्थ नाहीं काय ? "अविवाहित राहून तूं काय दिवे लावणार ? ती लग्न करीत नाहीं तर त्यांत तुझा काय दोष ?...एकजण दुसऱ्याच्या घरीं जातो काय, तेथें एक मुलगी पाहतो काय आणि धाड्कन प्रेमपाशांत सांपडतो काय ! साराच पोरकटपणा." हें मात्र खोटें. माझें कांहीं इतरांच्यासारखें खोटें प्रेम नाहीं. तें सहजोद्भव व चिरकालिक आणि खरेखुरें आहे. पण कदाचित् मला आतां-या घटकेला वाटत असेल. मनापासून वाटत असेल. पण खरें पहातां तो आभास असेल—

नाहीं. मी कांहीं इतरांच्यासारखा नाहीं. माझें प्रेम निःसंशय शुद्ध व सात्त्विक आहे. परमेश्वरसाक्ष !

माझा निश्चय जरी कायम आहे-मी तिला विसरणें या जन्मीं जरी शक्य नाहीं व मला माझ्याबद्दल जरी पूर्ण आत्मविश्वास आहे तरी लग्न करणेंच अखेर शहाणपणाचें ठरेल काय ? मी लहान आहें. अज्ञ आहें, भावनामय आहें म्हणून मोठ्या माणसांची शिकवण, अनुभव, व्यवहार मला कळले तरी वळत नसतील. दूरवर विचार केला तर मामाचें म्हणणें ऐकणें श्रेयस्कर नाहीं का होणार ? आत्तां मला वाईट वाटेल, माझें मन मला खाईल, निश्चयापासून ढळला म्हणून लोक माझी कवडीमोल किंमत करतील-पण ईश्वरसाक्ष-मी जरी लग्नाला तयार झालों तरी तें नाइलाजानें मी करीन-माझ्या मनांत नसतां-इच्छेविरुद्ध करीन. माझें कोठेंतरी चुकतें आहे पण मला तें कळत नाहीं, म्हणूनच आज लग्नाची कल्पना जरी मला असह्य वाटली तरी व्यवहाराकडे पाहून व आपलें चुकत असेल या समजानें-अत्यंत नाखुषीनें मी-केलेंच तर-लग्न करीन. माझें प्रेम दिखाऊ-खोटें तात्पुरतें होतें-म्हणून नव्हे. अगर माझ्या आत्मविश्वासाबद्दल संशय येऊन नव्हे. किंवा मी लग्नाला हपापलों आहे म्हणूनहि नव्हे. तर एक कर्तव्य म्हणून. आपल्याला आत्तां जरी वाटत आहे कीं जन्मांत मी तिला विसरणार नाहीं-माझा निश्चय कायम टिकेल अशी जरी खात्री वाटत

आहे तरी हा सगळा वेडगळपणा आहे–लग्न न करण्याला संयुक्तिक कारण कांहींच दाखवितां येत नाहीं, म्हणून. आणि मी तिला विसरण्याचा यत्न करीन.

अशा मनःस्थितींत असतां त्याला एक पत्र आलें. पत्र अलाहाबादच्या शिक्क्याचें होतें. मधुकरनेंच तें लिहिलें होतें. त्याचा सारांश असा होता कीं सुंदरच्या लग्नाचें घाटत आहे तर काशीनाथ तिला पत्करील काय ? म्हणजे त्यांचा स्नेहसंबंध नात्यानें दृढ होईल. सुंदर काशीनाथानें प्रत्यक्षच पाहिली होती व तिच्याबद्दल त्याला बरीच माहिती झालेलीच होती. मधुकरच्या घराण्याविषयीं लिहिण्याची जरूरीच नव्हती. काशीनाथाचा रुकार असला–आणि तो असणारच–तर त्याच्या वडिलांजवळ मोठेपणीं गोष्ट काढणें ठीक पडेल.

पुनः पेंच पडला. लग्नासंबंधीं गोष्ट निघाली की त्याची समता ढळे, व अंतःकरणाची कालवाकालव होई. त्याला ती पहांट आठवे. तीं चित्रें आठवत. तें काशीचें स्वदस्तुरीचें पत्र आठवे. सर्व गोष्टी त्याच्या डोळ्यापुढें उभ्या रहात. काय करावें त्याला मोठा प्रश्न पडला. व त्यामुळें तो अगदीं गोंधळून गेला.

परंतु, याच्या आधींच त्याच्या मनाची थोडी पूर्वतयारी झाली होती. अविवाहित राहून तो कोणतें कार्य साधणार होता ? पक्षीसुद्धां संसार करतात. जगांत होऊन गेलेले व ह्यांत असलेले बहुतेक मोठे लोक विवाहित–संसारीच आहेत. विवाह न करणें दुबळेपणाचें लक्षण आहे. ज्याला घराचा संसार माहीत नाहीं तो विश्वसंसार काय करणार ? जो संसारांतील दुःखांनीं पोळला नाहीं तो दुसऱ्यांचे–संसारी लोकांचें दुःख काय जाणणार ? आणि सारें कशाकरतां ? पहिल्यापासूनच संसारपाशांत पडावयाचें नाहीं–अविवाहित राहून अमूक एक कार्य करून दाखवावयाचें असा त्याचा आधींपासून निर्धार होता म्हणून काय ? नाहीं, एक मुलगी आपल्याशीं लग्न करीत नाहीं म्हणून. म्हणून पूर्वीच्या सर्व आशा फोल करावयाच्या ?

सुंदर अगदीं मनासारखी मुलगी होती. पण—

" तूं तिला लवकरच विसरशील. एकदम मुलगी पाहिली आणि प्रेम बसलें –ही का प्रेमाची रीत ! परिचयानें प्रेम उत्पन्न होतें–वाढतें–समजतें." मुळींच नाहीं त्यापेक्षां सुंदरच्या घराण्याची काशीनाथाला माहिती होती, त्यानें तिला प्रत्यक्ष पाहिलें होतें, तिच्या सहवासांत त्यानें चार दिवस घालविले होते.

सुंदरशीं लग्न केल्यास काशीची हालहवाल नेहमीं कळेल–तिचा सहवासहि मधूनमधून घडेल. काशीशीं लग्नच झालें नाहीं म्हणून काय बिघडलें. कोठेंहि ती सुखांत असलेली कळलें म्हणजे झालें. यापेक्षां प्रेम म्हणजे आणखी तें काय? अविवाहित राहिल्यास व सुंदरला नकार दिल्यास काशीनाथाचा मधूशीं तिळका संबंध अर्थातच राहणार नाहीं–परकेपणा येईल व मग काशीचें कुशल देखील कळण्याची मारामार.

रात्रंदिवस काशीनाथाचा विचार चालू होता. मनोविकारांची खळबळ उडाली. झाली गोष्ट झाली नाहीं असेंच मी समजेन. मी तिला विसरेन. ती मला कधीं दिसलीच नाहीं असें समजेन. लग्न लावतांना–सुंदरशीं किंवा दुसऱ्या कोणाशीं लग्न करतांना मला आत्यंतिक वाईट वाटेल पण नाइलाजानें मी लग्नाला उभा राहीन. आतां वाटत नसलें तरी कांहीं वर्षांनीं मला खास वाटेल कीं वेडेपणा सोडून लग्न केलें हें किती तरी बरें केलें!

अत्यंत नाखुषीनें–केवळ नाइलाजास्तव काशीनाथानें रुकार दिला. लग्नाच्या गोष्टी म्हणजे गुदगुल्या करणाऱ्या–मुलगी पसंत पडली म्हणजे आनंद व्हायचा, लग्न ठरलें म्हणजे स्वर्ग दोन बोटें उरावयाचा, लोक चेष्टा करूं लागले म्हणजे मनांत आनंदाच्या उकळ्या यावयाच्या व लग्न ठरल्यापासून लग्न होईपर्यंत ब्रह्मानंद अनुभवित असावयाचें–पण काशीनाथाच्या बाबतींत सारें उलट होतें! आपल्या मनाच्या शिकवणीविरुद्ध एकप्रकारच्या संन्यस्तवृत्तीनें त्यानें लग्नाला अनुमोदन दिलें. त्या वेळेस त्याला काय काय वाटलें असेल आणि कसें कसें वाटलें असेल तें त्याचें त्यालाच माहीत. त्याचें मन त्याला खात होतें. त्याचें अंतःकरण पिळून निघत होतें. वृत्ति कावरी–बावरी झाली होती. हो म्हणण्यापेक्षां आत्महत्या तरी का करूं नये असाहि त्याला विचार येऊन गेला पण अविवाहित राहण्याच्या दुबळेपणापेक्षांहि तो विचार भ्याडपणाचा–नेभळटपणाचा त्याला वाटला.

कर्तव्य म्हणून प्रत्यक्ष मुलाला फांशीची शिक्षा ठोठावतांना काय वाटत असेल? कर्तव्य म्हणून आपल्याच बायकोची मान तरवारीनें कापणाऱ्या लढवय्या रजपुताला काय वाटत असेल? तेंच–तसेंच काशीनाथाला वाटलें.

लग्न म्हणजे आयुष्यांतील आनंदाचा संस्मरणीय दिवस. पण काशीनाथाला तो दुःखामुळें चिरस्मरणीय वाटला. इतक्या दुःखांत त्याचे आजपर्यंतचे दिवस

कधींच गेले नव्हते. लग्नाची तिथि जवळ येत असतां पुनः पुनः त्याला वाटे कीं बस्! कांहीं नको. झाला तोच विचार कायम—अजून लग्न मोडावें; छीः थूः होईल. पण बेहेत्तर. लग्न मोडावें आणि कोठें तरी पळून जावें.

दर घटकेला—दर क्षणीं त्याला असा विचार येई. पण पळून जाऊन आपण काय मिळविणार? कोणतें देशकार्य साधणार?

लग्न थाटांत झालें. लोक आनंदांत होते. पण काशीनाथ? तो त्याला प्रेम-निधनाचा दिवस वाटला. ते सगळे लग्नसोहाळे—पूजा संस्कार त्याला उत्तर-क्रियेप्रमाणें वाटले. वरातीचा गृहप्रवेश म्हणजे आवडत्या मृत मनुष्याला अग्नि दिल्यानंतर परत घरीं येण्याप्रमाणें त्याला वाटला.

* * * *

काशीनाथाला विचाराअंतीं वाटलें होतें कीं आपण काशीला विसरूं पण अजून तो तिला विसरला नव्हता. त्याचें लग्न होऊन आतां बरेच दिवस झाले होते. तो मनांत कुढत होता. आतां आपलें दुःख दुसऱ्या कोणाजवळ सांगणार? पत्नीला—सुंदरला तर तें सांगणें शक्यच नव्हतें. काशी जर कोणी तिऱ्हाईत असती, म्हणजे सुंदरची बहीण नसती तरी देखील गत इतिहास सांगून सुंदरचें मन दुखवावें कीं नाहीं याचा त्याला विचार पडला असता. पण कदाचित् वेडा होण्याची पाळी आल्यामुळें त्यानें सांगितलेंहि असतें. पण आतां काशीच्या बहिणीला ती गोष्ट कळविणें शक्य नव्हतें.

काशीनाथाच्या उदास वर्तणुकीवरून कोठें तरी कांहीं तरी झालें आहे इतकी तिला कल्पना होती पण याला कारण आपलीच बहीण हें मात्र तिच्या स्वप्नांतहि आलें नाहीं. कारण काशीनाथानें मागणी घातल्याबद्दल तिला कांहींच कळविण्यांत आलें नव्हतें. त्यालाहि कारण हेंच कीं सुंदर काशीनाथाला द्यावयाची असा मधूनें पूर्वींच संकल्प केलेला होता व अशा स्थितींत काशीला मागणी घातल्याची गोष्ट सुंदरपासून महाप्रयासानें छपविणेंच इष्ट व जरूर होतें.

काशीनाथ खंगत चालला होता. तासचेतास तो विचार करी. त्याला झोंप येऊं नये. एखाद दिवस मध्यरात्रींच तो जागा होई व मग फिरून त्याला झोंप येत नसे. संसारांत लक्ष घालण्याचा तो प्रयत्न करी पण त्यांत त्याला गोडीच वाटेना. क्वचित् प्रसंगीं तो तिरसटपणा करी व मग त्याबद्दल त्याचें त्यालाच वाईट वाटावें. त्याचा स्वभाव बदलत चालला. त्याचा मूळचा आनंद पार

मावळला. मित्रांत उठण्याबसण्यास त्याचें मन घेईना. कधीं चुकून पत्ते खेळायला बसला तरी त्याला आपलीं पानेंहि लक्षांत राहूं नयेत, किलवर उत्तारीवर लालबदाम खेळूं लागला !

आपल्याकडून सुखी करण्याचा सुंदर झटून प्रयत्न करूं लागली. व आपली मनःस्थिति बाहेर दिसूं नये म्हणून काशीनाथ खटपट करी. कित्येकदां नकळत त्याचे डोळे अश्रूंनीं भरून यावे, कंठ दाटून यावा किंवा कधीं अश्रू ओघळूंहि लागावे. सुंदरनें चुकून पाहिल्यास ती त्याचें कारण विचारी पण कांहीं नाहीं कांहीं नाहीं म्हणून तो उडवाउडवी करी व सुंदरनें तें विसरावें म्हणून कांहीं तरी तिच्या आवडीचा विषय काढी व तिला एखादी नवी वस्तू आणून देई.

याप्रमाणें दिवसामागून दिवस जाऊं लागले. त्या घरीं कोणालाच सुख नव्हतें. मध्यंतरी कांहीं कारणानें—वडील आजारी असल्यामुळें—सुंदर माहेरीं गेली होती. तिला पोहोंचवायला आपण स्वतःच जावें असें काशीनाथाला वाटलें. पण त्यानें तो विचार झुगारून दिला. कारण त्याला काशीला विसरायचें होतें. नेहमीं त्याला वाटे कीं सुंदरच्या बहिणीला व मधूला आपल्या घरीं चार दिवस रहाण्यास बोलवावें. तिचें एखादें चित्र युक्तीनें आणावें किंवा तिचा फोटो मिळवावा. हें सहज शक्य होतें. पण तिला विसरावयाचा त्यानें निश्चय केला होता. दिवाळसणाला देखील जावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें. पण त्याच वर्षी मधूचे वडील एकाएकी वारल्यामुळें दिवाळसणच झाला नाहीं !

सुंदर माहेरीं असतांना तर काशीनाथाची विलक्षण स्थिति झाली. आतां घरीं त्याला विरंगुळा कांहींच नव्हता. काशीबद्दल अधिकच हुरहूर लागली. तिच्या हातचें तें पत्र—त्यानें दुःखांत भर घातली होती. तें पत्र त्यानें लपवून जपून ठेवलें होतें व सुंदर नसली म्हणजे तो तें चोरून पहात असे. अखेर एक दिवस तो उठला, दाराला त्यानें आंतून कडी लावून घेतली व एक काडी ओढून तें पत्र त्यानें जाळून टाकलें. व तो पुष्कळ रडला. तिची आठवण आतां स्मरणांत काय असेल तीच. दृश्यस्वरूपांत तिच्या आठवणीचें कांहीं उरलें नव्हतें.

सुंदर माहेरी असतां काशीनाथाची तिला वरचेवर पत्रें जात. व लवकर येण्याबद्दल त्यांत लिहिलेलें असे. तिच्यावांचून त्याला मुळींच करमत नव्हतें. ती केव्हां एकदां परत येईल असें त्याला झालें होतें.

नाटक सिनेमा पहाणें त्यानें वर्ज केलें कारण त्यांतल्या प्रेमाच्या नवलकथा पाहून त्याच्या हृदयाला तळमळ लागे. कादंबऱ्या देखील वाचूं नयेशा वाटाव्या. वाचतां वाचतां त्याच्या भावना उचंबळून येऊन डोळ्यावाटे खळकन् पाणी यावें.

दूरदर्शीपणानें, समंजसपणानें पण इच्छेविरुद्ध त्यानें जी गोष्ट केली त्याचा असा परिणाम होईल असें त्याला वाटलें नाहीं. त्याच्या लग्नाला उभें राहण्याच्या कारणांची मीमांसा तर्कशुद्ध होती पण ती कबुली अंतःकरणाविरुद्ध बंड करणारी होती.

* * * *

एके दिवशीं संध्याकाळीं काशीनाथ घरीं परत आला, त्यावेळीं सुंदरच्या तोंडाकडे पाहून त्यास असें दिसून आलें कीं ती रडत होती. कारण विचारतां 'कांहीं नाहीं' असें ती म्हणाली व रडत असल्याचें तिनें नाकबूल केलें. बापाची आठवण झाल्यामुळें असेल असें प्रथम काशीनाथाला वाटलें. पण सुंदरनें अबोला धरला होता. काशीनाथ जेवायला बसला पण सुंदर कांहीं बसेना. 'आज बरोबर जेवायचं नाहीं का ?' असें त्यानें विचारलें पण 'मी मग बसेन' असें ती म्हणाली. पण काशीनाथाचें जेवण झाल्यावर ती जेवायला बसली नाहीं. 'मला बरें नाहीं,' अशी तिनें सबब सांगितली. पण आज कांहीं निराळाच प्रकार झाला असला पाहिजे–सुंदरनें आज रागावूनच अबोला धरला आहे व रागामुळेंच ती जेवीत नाहीं, हें त्यानें ओळखलें. त्यानें तिची पुष्कळ समजूत घातली. पण ती ऐकेना. अखेर रडत रडत ती म्हणाली. 'मग करूं काय ? तुम्हीं नेहमीं उदास असतां, कधीं मोकळ्या मनानें बोलत नाहीं. अर्धरात्रीं उठून विचार करीत बसतां आणि मी कां म्हणून विचारलें तर उडवाउडवी करतां. तुम्ही जर याचं कारण सांगत नाहीं तर मी तरी काय म्हणून सांगेन. होय. मी आज रागावलें आहे. म्हणूनच मी जेवलें नाहीं व तुम्हीं खरें कारण सांगेपर्यंत मी उपाशींच रहाणार.'

काशीनाथ गहिंवरला. त्याच्याहि डोळयाला पाणी आलें. त्याला मनस्वी वाईट वाटलें. पण ती गोष्ट सांगून सुंदरला अधिक दुःखी करावें असें त्याला वाटेना. कांही तरी सबबी त्यानें सांगितल्या पण एकहि गोष्ट सुंदरला पटली नाहीं.

दुसरे दिवशीं दुपारीं कोणींच जेवलें नाहीं ! रात्रींहि जेवण्याचा कल दिसेना. अखेर सुंदर म्हणाली, 'तुम्हीं जेवा–मी तुम्हांला कांहीं विचारणार नाहीं.

शपथेवर तिनें सांगितलें. दोघेहि जेवावयास बसले पण कोणासच जेवण जाईना.

मध्यरात्रीं काशीनाथ उठला. त्याला झोंप आलीच नव्हती. हळूंच हलवून त्यानें सुंदरला उठविलें. तीहि अर्धवट जागीच होती.

“लाडके,” तो म्हणाला, “सांगतों, ऐक. पण तूं मला क्षमा केली आहे असें म्हण. तरच सांगेन. म्हण ना—”

“हें काय?” ती ताड्दिशीं उठून बसून म्हणाली, “मी कसली क्षमा करणार. सांगा गडे लवकर.”

“मी इतके दिवस तुझ्यापासून गोष्ट चोरून ठेवली होती-पण केवळ तुला दुःख होऊं नये म्हणून. तुला दुःख होऊं नये म्हणूनच मी ती गोष्ट मनांतच ठेवली. व जरी मला कोणाला तरी सांगावें असें झालें होतें-तरी मी आपलें दुःख आपल्यापशींच ठेवलें, गिळलें. तें दुःख तसेंच अंतःकरणांत कोंबून ठेवायला देवानें मला बळ दिलें असतें तर किती छान झालें असतें. मी तुला आतां कष्टी करणार. लाडके-किती मी वाईट! आपलें दुःख आपल्याला संभाळतां येऊं नये हा किती कमकुवतपणा! मी पुष्कळ प्रयत्न केला. तिला विसरण्याचा प्रयत्न केला-हो-सगळें सांगतों आतां-पण तें मला साधलें नाहीं. माझ्या चर्येवर, माझ्या वागणुकींत तें सगळें बाहेर पडलें. नाहीं ना तूं रागावणार?—तिला मी प्रथम पाहिली तेव्हांपासूनच ती मला आवडली. नंतर तिचे एकएक गुण मला कळलें-चित्रें काढणें, लेख लिहिणें, एकका दोन. सर्वच माझ्या आवडीचे विषय होते. मग तर मी प्रेमानें वेडाच झालों—”

आपलें लाजिरवाणें तोंड दिसूं नये म्हणूनच कीं काय त्यानें तोंडावर हात ठेवले व स्फुंदत स्फुंदत व मधून थांबत तो आपली कहाणी सांगत होता.

“मला वाटलें मी विसरेन. तिला लग्नच कर्तव्य नव्हतें. पण नाहीं, मी तिला विसरूं शकलों नाहीं. तिला विसरावें, म्हणून मी तुझ्याशीं लग्न केलें. पण त्यामुळें तिची आठवण ज्यास्त ज्यास्तच होऊं लागली. तरुणपणीं समजत नाहीं, मन भावनामय असतें, पुढें पश्चात्ताप होतो म्हणून साऱ्या गोष्टी विसरून मी लग्नाला उभा राहिलों. पण कसचें काय! प्रेमाच्या बाबतींत तर्कशास्त्र काय कामाचं! ती तिसरीच एखादी मुलगी असती तर मी तुला कदाचित् पूर्वींच ही सारी हकीगत सांगितली असती. पण-पण ती तुझी प्रत्यक्ष बहीण-”

सुंदरच्या मनांत हळुहळू प्रकाश पडूं लागलाच होता. ती एकदम दचकली. "काय ?–माझी बहीण ?–काशी ?"

"होय–तीच ती—"

"अरेरे !" एवढेंच सुंदर म्हणाली.

सुंदरच्या मनांत आतां निराळेच विचार गोंधळ घालूं लागले. क्षणभर ती जगाला विसरल्यासारखी दिसली. तिला हेवा वाटला ? तिला राग आला ? मत्सराग्नि तिच्या हृदयांत भडकला ? पतीविषयीं तिचें मन कलुषित झालें ? कीं आत्महत्त्या करावीसें तिला वाटलें ? कांहीं तरी विचार ती कायम करीत होती.

"लाडके–इतके दिवस ही गोष्ट लपविली–प्रत्यक्ष बायकोपासून लपविली म्हणून तूं रागावणार नाहींसना ? माझ्या मनाच्या तळमळीकडे पाहून–मी आपल्याकडून प्रयत्न करीत होतों—"

"असं काय ? मीच अपराधी आहें. आपणच मला क्षमा केली आहे म्हणा, माझ्या गळ्यावर हात ठेऊन म्हणा." अखेर कांहीं निश्चय करून ती म्हणाली.

"तूं ? तुझा काय अपराध ? उगीच का स्वतःला दोष लावतेस ?"

"कारण मीहि एक गोष्ट आजपर्यंत आपल्यापासून लपवून ठेवली आहे. प्रत्यक्ष पतीपासून चोरून ठेवली आहे."

"काय ? तूं ? कोणती ?"

"हो. पण त्याला कारणंहि तशींच होतीं. केलीना क्षमा ? ठेवा गळ्यावर हात. त्याला कारणंहि सबळ होतीं. ती गोष्ट म्हणजे आमच्या घराण्याला एक प्रकारें लांछन होतं–त्यामुळें माझ्या लग्नाला–मधूदादाच्या लग्नालाहि अडचणी आल्या असत्या–हें पहा, तें सगळं खोटं. तिला चित्रं काढतां येतात तें खोटं–तिला लेखनवाचनाचा नाद आहे हें खोटं–तिला वीणकाम येत नाहीं–तीं चित्रं सगळीं माझींच, मींच काढलेलीं. तें रेशमाचं भरीव काम माझंच–जिथं तिथं आपलं नांव घालायचं तिला वेड होतं, त्या छापलेल्या सगळ्या गोष्टी माझ्याच. हें गुपित फुटूं नये म्हणून आम्हीं कांहीं तरी खोट्या बतावण्या करीत होतों–तिला वाचनाचा नाद असल्यामुळें ती सारा दिवस खोलींत कोंडून बसलेली असते, चार चौघांत बोलाबसायलाहि येत नाहीं, खोलींतच वाटेल तेव्हां जेवते, चित्रकलेंत ती दंग असते–असं आम्हीं म्हणायचं–तें सारं सारं खोटं. आम्हींच

तिला खोलींत कोंडल्यासारखी ठेवीत होतों-तिला चार चौघांत येऊन देत नव्हतों-तिची सगळीच व्यवस्था निराळी-चोरून होत होती-कारण-"सुंदरला एक हुंदका आला व गळा अत्यंत दाटून आल्यामुळें बारीक व आंतल्या आवाजांतून पुढील शब्द बाहेर आले-"कारण ती वेडी-पूर्ण वेडी आहे. लहानपणापासूनच ती वेडी आहे."



# पत्नी



[ " वहिनी," ( गोष्ट ) अरुणमाला, पुंज ९-१०, मे-जून १९२६, लेखक रा. मो. ग. रांगणेकर. गोष्टीचा सारांशः-विश्राम व कुसुम यांचें लहानपणीं प्रेम जडलें होतें, पण यामुळें त्यांची मुद्दाम ताटातूट करण्यांत आली. विश्राम कष्टून दूरदेशीं निघून गेला. कांहीं दिवसांनीं तो आपला मित्र कमळाकर याच्या घरीं पाहुणा आला. पाहातो तों घरीं कुसुम ! तिचें कमळाकरशीं लग्न झालें होतें व त्यांना एक मुलगी पण होती ! विश्राम खिन्न मनानें तें घर सोडून एकाएकीं निघाला ! ! ]

परत दिल्लीला जाण्याच्या बेतानें विश्राम गेला तो बोरीबंदरच्या स्टेशनवर. परंतु दिल्लीचें तिकीट मागण्याऐवजीं त्यानें मुंबईचेंच तिकीट मागितलें. तिकीट मास्तरनें थोड्या त्रासिक स्वरानें व थोड्या तुच्छतेनें 'एँ ?' केलें. विश्रामनें म्हटलें, 'व्हिक्टोरिया टर्मिनस,' तोंच आपली चूक त्याच्या लक्षांत आली. 'आपलं दिल्ली सदर-अं-अं-थांबा अं जरा-असें घुटमळत तो कोंडींतून बाहेर पडला. त्याच्या लक्षांत आलें कीं, आपण कंपनीच्या कामाकरतां आजच दिल्लीहून आलों-अद्याप मॅनेजरला भेटलों नाहीं-मुख्य काम झालेंच नाहीं, आणि परत दिल्लीला जाऊन काय करणार ? व्हिक्टोरिया टर्मिनसचें तिकीट त्याला नको होतें, इतकेंच नव्हे तर दिल्लीचेंहि नको होतें. चित्तक्षुब्ध स्थितींत त्याला त्याचें भान उरलें नव्हतें. वाटभर कुसुमचे विचार त्याच्या डोक्यांत घोळत होते. नकळत तो दिल्लीच्या बेतानें निघाला होता.

तिकीट मास्तर शेजारच्या खिडकीतील संवगड्यास व आपणालाच उद्देशून तिरसपटणें हंसत म्हणाला, 'हाफ्-मॅडच आहे !' जातां जातां ते शब्द विश्रामच्या कानीं पडले. तो आपल्या मनाशींच म्हणाला, 'हाफ्-मॅड नाहीं, मी अगदीं सपशेल वेडा होणार ! हवं होतं तेव्हां दूर पळविलं होतं आणि नको आहे तर जसं वाढून आलं.'

गाडी करून विश्राम आपल्या घरीं गेला.

* * * *

या गोष्टीला पांच वर्षें झाली. एवढ्या अवधींत विश्रामच्या आयुष्यांत भयंकर क्रांति झाली होती. बऱ्याच कारणांमुळें एजंसी सोडून तो डॉक्टर बनला होता. त्याच्या दोन हातांचे चार हात जरा चमत्कारिक तऱ्हेनें झाले होते. त्यांत व्यवहाराचा भाग होता. प्रेमाचा प्रकार होता, विधिघटना होती. आणि त्या सगळ्या गोष्टींत एक प्रकारची गम्मत होती. ती अशीः—

कमळाकराच्या घरून तांतडीनें निघून विश्राम आपल्या स्वतःच्या घरीं गेला. तेव्हां त्याच्या शेजाराला दुसरेंच एक कुटुंब येऊन राहिल्याचें त्याला दिसून आलें. त्यांत १९।२० वर्षांची एक मुलगी होती. ती एक-दोनदां इंटर नापास झाली होती. विश्राम आणि पिरोज 'आंतरः कोऽपि हेतू'मुळें म्हणा किंवा बाहेरच्या कांहीं कारणामुळें म्हणा एकमेकांना आवडूं लागलीं. दोघेंहि म्लान असत. आनंद किंवा आशा एकाच्याहि तोंडावर कधीं दिसत नसे. तो कधीं सिनेमाला जात नसे; ती कधीं सिनेमाला जात नसे. तो कधीं ऐट करीत नसे; ती कधीं ऐट करीत नसे. तो क्वचितच भांग काढीत असे; ती क्वचितच फुलांची वेणी घालीत असे.

ते दोन दुःखी जीव एकमेकांकडे ओढले गेले. पण ते ओढले गेले ते प्रेमवश होऊन नव्हे. म्हणजे रूढ अर्थानें प्रेमपाशांत सांपडून नव्हे. तर एक प्रकारच्या समानशीलतेमुळे त्यांची मैत्री-गट्टी-जमली. जसें दोन सहाध्यायी, किंवा दोन रोगी, किंवा गडी आणि माळी, किंवा सुना किंवा कोणतेहि दोन दुःखी प्राणी. पति-पत्नी किंवा 'आशुकमाशुक' या अर्थानें नव्हे. विश्रामची मागें प्रेमाच्या बाबतींत निराशा झाली होती तशी पिरोजचीहि झाली होती! आणि म्हणूनच ती परीक्षेंत नापास व्हायला लागली होती. सहानुभूति व दया या दोन विकारांनीं एकमेकांचा जीव एकमेकांकडे लागला होता. विश्रामचे विचार नेहमीं कुसुमबद्दलच असत व पिरोजचे विचार तिच्या प्रियकराबद्दल असत. अर्जुन व सुभद्रा या मामेभाचीबद्दल जो एक प्रसंग सौभद्र नाटकांत दाखविला आहे तसलाच एक प्रसंग विश्राम व पिरोज यांजमध्यें एकदा घडून आला. स्थळ, वेळ आणि परिस्थिति एकदा जमून आली आणि कुसुमची आठवण होऊन नकळत विश्रामच्या डोळ्यांतून खळकन अश्रु आले व त्याचा कंठ दाटून आला. पिरोजला अत्यंत वाईट वाटलें व तिनें कारण विचारलें. अडखळत व स्फुंदत विश्रामनें आपली प्रेम-कहाणी सांगितली. "पण आमची मुद्दाम ताटातूट करण्यांत आली-" तो म्हणाला.

हें ऐकण्याबरोबर पिरोजलाहि रहावेना–ती तर ओक्साबोक्शीं रडूं लागली! "माझंहि असंच झालं–" तिनें हुंदके देत देत आपण होऊन म्हटलें.

रडत रडतच दोघांनीं एकमेकांची समजूत केली. अशा रीतीनें त्यांचीं अंतःकरणें एकमेकांकडे खेंचलीं गेलीं होतीं. पण तीं पति–पत्नी या नात्यानें नव्हे, तर दोन "समदुःखी" म्हणून. राष्ट्रांतील दोन गांजलेल्या पक्षांप्रमाणें.

पण दोन अविवाहित तरुण–तरुणींनीं अशा स्थितींत बहिणभावंडाप्रमाणें फार दिवस राहाणें हें स्वर्गांत शक्य असलें तरी मुंबईंतील 'गाळ्यावर'...!

पूर्वीच्या प्रेमकहाण्या विसरण्याची दोघेंहि खटपट करीत होतीं, पण त्यामुळें त्यांचा पुनः पुनः उच्चार मात्र अधिक वेळां होऊं लागला होता. हें कांहीं ठीक नव्हतें. कांहीं तरी तोड काढली पाहिजे होती. युक्ति केली पाहिजे होती.

आणि लग्नासारखी याला दुसरी कोणती युक्ति होती? असो. विश्रामच्या दोन हातांचे अशा रीतीनें चार हात झाले. पुढें—

*   *   *   *

परंतु अशा परिस्थितींत लग्न करण्यांत मोठीच चूक झाली असें हळूहळू दोघांच्याहि लक्षांत येऊं लागलें. नवरा–बायकोच्या प्रेमांत सहानुभूति हें एक अंग असलें–महत्त्वाचें अंग असलें तरी–हा केवळ एवढाच पाया बस्स होत नाहीं असें त्यांना कळून आलें. कोणाकडून येवढीशी जरी चूक झाली, किंवा झाली असें दुसऱ्याला वाटलें, तरी तेवढें कारण त्यांना आपल्या पूर्व-प्रेम–कहाणीची आठवण करून देण्यास पुरे होई. विश्रामला वाटे 'ती' असती तर तिनें असें केलें नसतें. आणि पिरोजला वाटे 'ते' असते तर असें झालेंच नसतें!

आणि 'ते' खरोखरच असते तर काय झाले असतें किंवा नसतें हें सुज्ञ लोकांस सांगावयास नकोच! पण विश्राम व पिरोज मात्र असल्या क्षुल्लक किंवा महत्त्वाच्या गोष्टींत नेहमीं नाराज होत व त्याला 'ती' आणि तिला 'तो' आठवे. अर्थात् लग्न झाल्यानंतर शक्यतों त्या 'ती–तो' चा उल्लेख मुळींच होत नसे. पण त्यांच्या मनांत आल्यावांचून राहात नसे. आपण उगीच या लग्नाच्या फंदांत पडलों असें त्यांना झालें. एक प्रकारें, जाणून–बुजून कांहीं तीं बोहल्यावर उभी राहिलीं नव्हतीं. त्यांचें 'तसें' प्रेम नव्हतेंच. यदृच्छेनें तीं एकमेकांजवळ आलीं होतीं, व त्यांच्या समदुःखीपणाचें रूपांतर लग्नांत होणें अपरिहार्य होतें. तीं शेजारीं शेजारीं राहात होतीं. बरोबर चहा पीत होतीं, फिरायला

जात होतीं. तीं हंसत होतीं, खेळत होतीं, रडत होतीं. लग्नच तेवढें लागलें नव्हतें. तें झालें म्हणून काय नुकसान होणार होतें? "समानशीले व्यसनेषु सख्यं." कामाकाजानिमित्त भेटणाऱ्या पण समानधर्म लोकांची खाजगी मैत्री जमते-सहजच जमते. जमणें अपरिहार्य असतें. प्रेमभंग झाल्यापासून विश्रामला आपलें दुःख हलकें करण्यास पिरोजखेरीज दुसरें कोण होतें? आणि तिला तरी विश्रामखेरीज अगदीं हृदयांतील कळकळीची सहानुभूति दाखविणारें दुसरें कोण होतें?

* * *

कमळाकर व कुसुम आपल्या लेकीसह-छबीसह-डॉक्टर विश्रामच्या घरीं पाहुणे म्हणून आलीं होतीं. वरकरणीं विश्रामनें जरी दाखविलें नाहीं तरी हे पाहुणे आल्याबद्दल त्याला मनांतून एक प्रकारचा आनंद होत होता. त्यानें कांहीं त्यांना बोलावले नव्हतें. कमळाकरच आपण होऊन आला होता. विश्राम आणि त्याची 'वहिनी' यांची भेट करविण्याची तर त्याची इच्छा नव्हती?

ती त्याची इच्छा तर सफल झालीच. पण त्याच्या ध्यानीं मनीं नसतां त्याचीहि एक अपुरी इच्छा कर्मधर्मसंयोगानें फळास आली! आणि पिरोजच्या स्वप्नांतहि नसतां तिला आपल्या पूर्वीच्या प्रियकराचें दर्शन घडलें! पण विश्रामासारखा फार्स त्यापैकीं एकानेंहि केला नाहीं!

कमळाकर आला तो आजारीच पडला. त्याला एकदम चार डिग्री ताप भरला व त्यानें अंथरुणच धरलें. हा आजार देवीचा ठरला!

त्या घरांत आतां मोठी विलक्षण परिस्थिति उत्पन्न झाली होती. विश्रामची प्रेमकहाणी कोणत्या व्यक्तीबद्दल होती हें पिरोजला माहीत नव्हतें व पिरोजच्या प्रेमाचा विषय विश्रामाला माहीत नव्हता. पण त्या दोन व्यक्ती-कमळाकर व कुसुम-प्रत्यक्ष त्याच्या घरांत होत्या. कमळाकरला विश्राम व कुसुम यांचा इतिहास कळला होता. पण कुसुमला मात्र कमळाकर व पिरोज यांची गोष्ट माहीत नव्हती.

विश्रामच्या घरीं देवीच्या रोग्याची चांगलीशी सोय होण्याजोगी नव्हती म्हणून त्यानें कमळाकराला आपल्या खास देखरेखीखालीं खाजगी रोगी म्हणून निराळ्या इस्पितळांत ठेवलें.

कमळाकर डोळ्यांना दिसला, इतकेंच नव्हे तर त्याची शुश्रूषा करण्याची संधि आपल्याला मिळणार यांतच पिरोजला एक प्रकारें समाधान वाटलें, व

'वहिनी'ला सहानुभूति दाखविण्यास ही उत्कृष्ट संधि आली त्यांतच विश्रामला दुःखांत सुख झालें. व अशा आणीबाणीच्या प्रसंगीं 'भावोजी' आपल्या मदतीला आहेत यांत कुसुमला मोठा आधार वाटला.

रोग देवीचा ठरल्याबरोबर इतरांच्या दृष्टीनें पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे घरांतील सर्व मंडळीला देवी काढणें ही होय.

डॉक्टर विश्रामनीं देवी टोचण्याची सर्व तयारी केली, व बायको, 'वहिनी' व छबू यांना प्रथम बोलाविलें. स्टोव्ह फूत्कार टाकीत होता. चाकू पाण्यांत उकळत होते. चोळीच्या बाह्या तिघींनीं वर केल्या. विश्रामनें ते तिन्ही दंड नीट पुसले आणि लसीची पेटी उघडली. पाहातात तों त्यांना सर्व कापूसच हातीं लागूं लागला–लसीच्या कुप्या कोठें गेल्या? का नव्हत्याच? त्यांच्या पोटांत धस्स झालें! त्यांनीं घाबऱ्या घाबऱ्या कापूस बाहेर काढला,–काढतां काढतां एक कुपी होती ती पेटींतच पडली व फुटली! अरेरे! त्यांच्या हृदयाला चरका बसला! दुसऱ्या कुप्या मागावयाच्या म्हणजे येथें पोहोंचेपर्यंत चार-सहा दिवस तरी लागायचे! सगळा कापूस उचकटून त्यांनीं तपासला–पण व्यर्थ! ती फुटकी कुपी झटकन् उचलून त्यांनीं एका चाकूच्या रुंद पात्यावर ओतली–तों त्यांत थोडीशी लस उरली होती–पण किती काटकसरीनें वापरली तरी फक्त दोनच माणसांना पुरण्याइतकी लस त्यांत निघाली!

ओ:! अरे राम! आतां काय करूं? कोणाला वांचवूं? त्यांच्या मनांत भयंकर चलबिचल झाली, पण त्यांनीं ती बाहेर दिसूं दिली नाहीं.

हाय! फक्त दोन जीवांना पुरेल इतकीच लस! आणि बाकीच्यांना काय टोचूं? बाकींचीं मरूं दे? बाकीचीं कोण? कोणाला वांचवूं? त्या पोरीला तर वांचवलेंच पाहिजे. अंतःस्फूर्तिच सांगत होती कीं, छबूला तर देवी काढल्याच पाहिजेत. पण दुसरं माणूस कोण? वहिनी कीं बायको? कुसुम कीं पिरोज? जिच्याकरतां त्यानें कॉलेजक्रमावर पाणी सोडलें, जन्मभूमीच्या गांवाचा त्याग केला, जिला विवाहित स्थितींत–मातेच्या स्थितींत–पाहातांच त्याचें हृदय कळवळलें, विजेप्रमाणें धक्का बसला ती कुसुम; त्याचें एके काळचें जीवनसर्वस्व, त्याची सुखाची सीमा, महत्त्वाकांक्षेची पराकाष्ठा, त्या कुसुमला वांचवूं कीं, आपल्याच बायकोला? जी हूं झालें कीं आपल्यावर रागावते, जिच्या मनांतून आपण उतरलों आहों, आणि केवळ कुसुमबद्दलच्या प्रेमभंगामुळेंच

जिला आपण जवळ केली ती पिरोज? जिनें आपलें मन पूर्वी दुसऱ्याच एकाला वाहिलें होतें व तें दुःख विसरण्याकरतां जी आपली मैत्रीण व नंतर क्रमानें पत्नी झाली.

विश्राम अद्याप पितृपद पावला नव्हता, तरी पण त्याचें मन त्याला सांगत होतें कीं, छबूला वांचव. पहिल्याप्रथम छबूला वांचव. लसीचा एकच डोस उरला असता तर त्यानें छबूलाच टोंचला असता. हाय! दोन डोस उरून मला संकटांत टाकण्यापेक्षां एकच डोस कां उरला नव्हता? माझ्या प्रेमाची परीक्षा देवाला पाहावयाची होती? माझें सत्व घ्यायला प्रत्यक्ष देवीनें कमळाकराच्या अंगांत प्रवेश केला होता? वास्तविक तर्कबुद्धीनें पहातां छबूला वांचविण्याऐवजीं त्या दोघी बायांना वांचविणेंच जास्त उपयुक्त होतें. उपयुक्त! प्रेरणा व उपयुक्तता! वात्सल्य आणि सरळव्याज!!

मनःप्रवृत्तींच्या बाबतींत, प्रेमाच्या, वात्सल्याचा बाबतींत, उपजत बुद्धीच्या बाबतींत सरळव्याजाचा हिशेब चालेल?

कुसुम कीं पिरोज याबद्दल खल करीत असतां विश्राम स्वतःला विसरला होता. स्वतः विश्रामाचें काय? तो आपल्याला नाहीं देवी काढून घेणार? दोन डोस होते, एक स्वतः विश्रामला, व उरलेला–? कुसुम, पिरोज किंवा छबू–? खरें पाहातां विश्रामनें जगणेंच अत्यंतावश्यक होतें; 'उपयुक्त' झालें असतें. तो घरांतला कर्ता होता, त्याच्या जिवावर आज चार मंडळी जिवंत होती. समजा, दुर्दैवानें विश्रामचेंच बरें वाईट झालें तर–? कमळाकर गेल्यानंतर कुसुमला राहून काय करावयाचें? विधवेची उपयुक्तता अधिक कीं भरल्या संसाराच्या सूत्रधाराची? कोण धाडशी व पापी विचार! पण त्यामुळें त्याच्या अंतःकरणाच्या चिंधड्या उडाल्या.

आत्मसंरक्षण आणि वंशवृद्धि या दोन उपजत बुद्धि प्रत्येक जीवाला दिल्या आहेत असें म्हणतात. विश्राम आणि पिरोज हीं दोघें वांचविलीं तर विश्रामच्या हातून या दोन उपजतबुद्धि अंमलांत आल्या असत्या.

पण आतिथ्य! आपल्या घरीं कुसुम पाहुणी होती. दुसरा युक्तिवाद घटकाभर दूर केला तरी आपल्या घरीं आलेल्या पाहुण्याला वांचविणें कर्तव्य नाहीं काय?

वाचकहो, इतका सगळा युक्तिवाद विश्रामच्या डोक्यांतून निमिषार्धांत गेला. लढाईच्या धुमश्चक्रींत एखादा विशेष प्रसंग घडला म्हणजे सेनानायक

पळभरांत सर्व सारासार विचार करून, परिस्थितीची अटकळ बांधून सैन्याची नवी रचना करण्याचा हुकूम देतो. त्याला वेळ लागत नाहीं, तो आंकडे–मोडी करीत बसत नाहीं, नकाशे काढीत नाहीं. त्याप्रमाणें विश्रामचें झालें. फरक इतकाच कीं सेनानायक व्यावहारिक बाजूनें पाहातो व आणीबाणीच्या प्रसंगीं मनुष्य अंतःप्रेरणेमुळें करतो.

विश्रामनें कोणाला टोंचलें ?

जिला त्यानें एकदा आपलें जीवनसर्वस्व वाहिलें होतें तिला, कीं तिचा विसर पडावा, तिच्यामुळें झालेल्या मनोयातनांत सहानुभूति मिळावी म्हणून जिच्याशीं त्यानें 'लग्नाची युक्ति' काढली तिला ?

पण विश्रामनें तर सर्वांना टोंचलें ! छबूला, कुसुमला, पिरोजला व स्वतःला ! तें कसें ? छबूला खरी लस त्यानें टोंचली. पण–हाय !–बाकीच्या तिघांपैकीं दोघांना अर्थात् खोटेंच टोंचावें लागलें–म्हणजे लस न भरतांच नुसतें चाकूनें त्यानें खरवडलें ! ! तसें करणें अपरिहार्य होतें. स्वतःला त्यानें लस लावली नाहीं हें सांगावयास नकोच. उरल्या कुसुम आणि पिरोज. यापैकीं एकींत त्यानें खरी लस टोचली व दुसरींत नुसता फार्स केला ! त्यानें खरी लस कोणांत टोचली ! कुसुमच्या दंडांत कीं पिरोजच्या ? प्रियकरणीच्या कीं पत्नीच्या ?

* * * *

केव्हां तरी लस टोंचली म्हणजे मनुष्य १०० टक्के अमोघ झाला असें थोडेंच आहे ! 'विटाळ' ( इन्फेक्शन ) झाल्यापासून दोन दिवसांच्या आंत देवी काढवून घेतल्या तर काढलेल्या देवी फुगतील व खऱ्या देवीची बाधा होणार नाहीं; दोन दिवसांनंतर पण तीन दिवसांच्या आंत काढल्या तर सौम्य स्वरूपाच्या खऱ्या देवी येतील; पण त्यानंतर काढल्या तर टोंचलेल्या देवी न फुगतां नेहमींच्या उग्र स्वरूपाचा देवीचा विकार होईल, असा सर्वसाधारण नियम शास्त्रांत सांगितला आहे.

कमळाकराच्या रोगाचें निदान होईपर्यंत तीन दिवस–ते घातकी तीन दिवस निघून गेले होते. म्हणजे अर्थात् चवथ्या दिवशीं विश्रामनें देवी काढल्या होत्या.

आपण अशी कल्पना करूं. दोघां उमेदवारांनीं एक कोडें सोडविलें.आहे व कोड्याचें उत्तर शक्य तितक्या लवकर १२ दिवसांत दिलें पाहिजे. आतां

हें कोडें दोन उमेदवारांनीं एकाच वेळीं सोडविलें आहे असें समजा. पण एकजण पायीं जाऊन तें उत्तर हजर करणार व दुसरा सायकलवरून जाणार. आतां हें उघड आहे कीं, दोघें एकाच वेळीं निघाले तर सायकलस्वार आधीं—समजा १० दिवसांत—जाऊन पोहोंचेल व त्याला एकट्यालाच तें बक्षीस मिळेल. समजा, सायकलस्वाराला निघायला एक दिवस उशीर झाला तरी तो अकराव्या दिवशीं पोहोंचेल व सबंध बक्षीस लाटील. पण कांहीं कारणानें तो दोन दिवस उशिरां निघेल तर मात्र पायीं जाणारा व सायकलस्वार एकाच दिवशीं पोहोंचतील व तें बक्षीस दोघांना निमे-निम वाटून घ्यावें लागेल. आतां सायकलस्वार जर चवथ्या दिवशीं निघेल तर मात्र त्याला १२ दिवसांत पोहोंचतां येणार नाहीं व तो तेराव्या दिवशीं जाऊन थडकण्याच्या आंतच आपला पायदळ गडी सर्व बक्षिसाचा मालक होईल.

देवीचा रोग व देवी काढणें यांत कांहींसा असाच प्रकार होतो. देवीच्या विषानें शरीरांत प्रथम प्रवेश केल्यापासून प्रत्यक्ष ताप वगैरे येऊन मनुष्य आजारी पडेपर्यंत सुमारें १२ दिवस लागतात. तेंच, देवी काढल्यापासून सुमारें १० दिवसांत मनुष्याच्या अंगांत देवीच्या विषाला मारक असे पदार्थ तयार होतात.

* * * *

त्या गोष्टीला चार दिवस लोटले. आणि कुसुमनें अंथरुण धरलें ! तिला खडकून—१०४—डिग्री ताप भरला ! देवीच त्या !

विश्रामचें रक्त गोठलें. काय करूं आणि काय नको असें त्याला झालें. आठ दिवस त्याला जेवण जाईना. कुसुमची आशा नव्हती.

आपलें गुपित ओकल्याखेरीज त्याला चैन पडेना. आपल्या बायकोकडे तो विलक्षण मुद्रेनें निरखून पाहूं लागला. कुसुमला तर देवी आल्या हें स्पष्ट दिसलें, आणि पिरोज वांचणार ना ? तिचे ओंठ ( तापानें ) वाळल्यासारखे दिसतात काय ? तिच्या तोंडावर ( तापाची ) लाली तर आली नाहीं ? निमित्तानें तिचें अंग कढत लागतें कीं काय तें उगीचच पाही. अखेर त्याला रहावेना. तो कुसुमच्या खोलींत गेला. ती निजली होती. खोलींत अंधेर होता. नीट दिसत नव्हतें. तो अलगद पावलांनीं तिच्या उशाकडे जाऊन बसला. रडें आवरेना. स्फुंदत तो हलक्या आवाजांत म्हणाला.

" कुसुम–मी तुला फसवलं. मी पापी आहें, काय करूं ग? सगळ्यांना पुरेशी लस नव्हती. मी तुला खोटंच टोंचलं!!! तें माझं प्रेम–त्या यातना, माझ्या बायकोच्या प्रेमापुढें व्यर्थ ठरल्या! मी माझ्या बायकोलाच वांचविलं! मला पश्चात्ताप होतो आहे–पण तो बायकोला वांचविण्याबद्दल नव्हे तर खोटं करण्याबद्दल. तुझ्याकडे माझ्या जीवाचा ओढा नसता तर मी हें सांगायला आलों नसतों जीव तुझ्याकडे पण हात बायकोकडे. तिचं मीं पाणिग्रहण केलं आहे. तिला वचन दिलं आहे. देव, अग्नि आणि ब्राह्मण यांसमक्ष वरलं आहे. आणि नसतं तरी माझा हात तिला वांचवायलाच गेला असता. कारण ती माझी बायको आहे. तिच्यावर माझं किती प्रेम आपोआप नकळत बसलं आहे हें त्या दिवसापर्यंत–ज्या दिवशीं मी तिला खरी लस टोंचली त्या घटकेपर्यंत मला माहीत नव्हतं!—"

इतक्यांत अंथरुणावरील व्यक्ति वळली व तिनें विश्रामच्या तोंडावर हात ठेवला. विश्राम दचकला. ती कुसुम नव्हती. त्याचीच बायको–पिरोज–होती! तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वहात होते.

कुसुमचा आजार घटकाभर दोघेंहि विसरलीं.

विश्रामच्या डोळ्यांतूनहि प्रेमाश्रु ओघळूं लागले व त्या दोघांच्या अश्रूंचा संगम झाला.



## शेवटचे दोन शब्द

एखाद्या आरोग्यविषयक मध्यवर्ती कल्पनेवर गोष्टीची उभारणी करावी, मात्र गोष्ट म्हटली तर गोष्ट व्हावी, या हेतूनें प्रस्तुत गोष्टी जुळविल्या आहेत.

या पुस्तकांतील सुमारें निम्मा मजकूर पूर्वी नियतकालिकांत प्रसिद्ध झाला होता.

उजेड व मोकळी हवा या आरोग्याच्या फुकट देणगीचें चित्र मलपृष्ठावर दिलें आहे.

गणेश-चतुर्थी, १८५५ लेखक